**राजा मंगळवेढेकर**

बारकू

कैवारी

**भा. रा. भागवत**

महेश उडाला भूर्रर्र

**डॉ. सि. ग. देसाई**

आळशांचा राजा

**बा. वा. फाटक**

मुंबईत किंगकाँग

खट्याळ ख्वाजा

ससा आला ससा

आले आले उंदीरराव

**सौ. माधुरी भिडे**

तिळा दार उघड

झोपी गेलेला जागा झाला

हिमपरी

**तारा चौधरी**

सिंदबादच्या सात सफरी




**३०, सी, खोताची वाडी**
**गिरगाव मुंबई ४०० ००४**

जगदीश काबरे

# कालयंत्र

ज्योत्स्ना प्रकाशन

# कालयंत्र

लेखक
**जगदीश काबरे**




मूल्य आठ रुपये

**प्रकाशक :**
ल. गो. परांजपे
ज्योत्स्ना प्रकाशन
३० सी खोताची वाडी,
गिरगाव, मुंबई-४०० ००४.

प्रथमावृत्ती – जानेवारी १९९०



**अक्षरछायाजुळणी :**
अक्षय फोटोटाइपसेटर्स
'कुलदीपक', सुभाष पथ,
ठाणे-४०० ६०१.
दूरध्वनी : ५९ १६ ७६

**मुद्रक :**
अशोक बागवे
सुदर्शन ऑफसेट
वडाळा उद्योग भुवन,
मुंबई-४०० ०३१.



## अनुक्रमणिका




# कालयंत्र

विशालचं वेड दिवसेंदिवस वाढतच चाललं होतं. त्याचं कशातही लक्ष लागत नव्हतं. कसंबसं शाळेत जाऊन यायचा तेवढंच. त्याच्या वडिलांना काळजी पडली होती. कसं व्हायचं या पोराचं! यंदाचं दहावीचं वर्ष आहे आणि यानं तर डोक्यात काही वेगळंच खूळ घेतलंय. 'काय म्हणे, तर मी कालयंत्र बनवीन अन् त्यातून विश्वाच्या भूतकाळात आणि भविष्यकाळात जाईन.'

या वेडापायी त्याला हल्ली जेवणही सुचत नव्हतं. शाळेतनं घरात आला रे आला की, कसंतरी आई बळजबरीनं त्याला दोन घास खायला लावायची. एकदा का ते दोन चार घास पोटात ढकलले की हा त्याच्या खोलीत जाऊन बसायचा. त्याने तयार करत आणलेल्या कालयंत्राशी खुडबूड करत बसायचा. तो पुन्हा एकदम रात्री आईनं जेवणासाठी हाक मारली की या जगात यायचा. पण तरीही खोलीतनं बाहेर काही पडायचा नाही. शेवटी आई त्याला उचलून – खेचून घेऊन जायला यायची तेव्हाच तो नाईलाजानं उठायचा.

त्याच्या अशा वागण्यामुळे त्याच्याकडे हल्ली मित्रही येईनासे झाले होते. तो कुणाशीही बोलत नसे. समजा, त्याच्याशी एखादा मित्र बोलण्याचा प्रयत्न करू लागला की, हा आपल्या यंत्राविषयीचे स्वगत विचार मोठ्यानं बोलायचा. त्या मित्राला बिचाऱ्याला काही कळायचं नाही. मग थोड्याच वेळात तो वैतागून सुंबाल्या ठोकायचा.

आजही असाच तो त्यानं बनवलेल्या कालयंत्राशी खुडबूड करीत बसला होता. ते पूर्ण तयार झालेलं होतं. फक्त शेवटचा हात फिरवणं राहिलं होतं.

'आता चाचणी घ्यायला हरकत नाही', असं स्वत:शीच पुटपुटत त्यानं त्या कालयंत्राचं एक विशिष्ट बटण दाबलं. त्याक्षणी एक झगझगीत प्रकाशशलाका त्या कालयंत्रातून बाहेर पडली. त्याची खोली गोलाकार फिरल्यासारखी त्याला वाटू लागली. दोन अँटेना खोलीच्या छतावर उघडले गेले. यंत्रातील संगणकातून हिरवा प्रकाश बाहेर पडू लागला आणि हिरव्या रंगात अक्षरं पडद्यावर उमटली – 'कुठच्या काळात जायचंय ?'

आनंदानं विशालनं ते बटण बंद केलं. सारं कसं व्यवस्थित घडत होतं. त्यानं मग पुन्हा एकदा कालयंत्राची रचना व्यवस्थित न्याहाळली. सगळ्या जोडण्या नीट झाल्या आहेत हे पाहून त्यानं शेवटचा स्क्रू पिरगळला.

बाहेर तिन्हीसांजा झाल्या होत्या. हळूहळू अंधार आपले बाहू पसरून सर्वांना आपल्या कुशीत घेऊ लागला होता. विशालला खोलीत दिवा लावायचीही शुद्ध राहिली नव्हती. त्याच्या हृदयाचे ठोके वाढू लागले होते. मेंदूला शिणवटा आला होता. पण त्याचं मन मात्र आनंदानं उचंबळून आलं होतं. त्यानं केलेला प्रयोग आज पूर्णपणे यशस्वी झाला होता. त्याची इच्छा पूर्ण होण्याच्या मार्गावर होती. त्याची टिंगलटवाळी करणाऱ्यांना... त्याला वेडं ठरवणाऱ्यांना तो आता आश्चर्यचकित करणार होता.

अचानक विशालला वाढत जाणारा आवाज ऐकू येऊ लागला. पाठोपाठ मोठी प्रकाशशलाका झळकली. तिनं त्याचे डोळे दिपून गेले. त्याच्यासमोर एक सोनेरी कपडे घातलेला दहा फूट उंचीचा धिप्पाड माणूस उभा राहिला. विशालला एकदम अल्लाउद्दीनच्या घासलेल्या दिव्यातून निर्माण झालेल्या राक्षसाची आठवण झाली. त्याला बघून तो थोडासा घाबरला. पण तो माणूस मात्र हसत होता. त्याच्याकडे मैत्रीच्या नजरेनं पहात होता.



विशालला कळेना हा असा अचानकपणे समोर आला कसा. कदाचित आपल्याला भास झाला असेल म्हणून त्यानं अंग सैल करून एक दमदार आळस दिला. स्वत:ला बारीकसा चिमटाही काढला. पण तो माणूस त्याच्यासमोर उभाच होता, हसतमुख.

'तू... तू आत कसा आलास ? तुला काय पाहिजे ?' अचानकपणे त्याच्या तोंडून प्रश्न बाहेर पडले.

विशालचं बोलणं संपतं न संपतं तोच तो दहाफुटी कमालीच्या शांतपणे म्हणाला, ''आम्ही तेविसाव्या शतकाच्या मध्यातील आहोत. आमचं वर्ष आहे १ मे २२६७.''

''म्हणजे तुमच्याकडंही इथल्याप्रमाणं वसंतऋतू चालू आहे तर.'' विशाल उगीचच काहीतरी बोलून गेला. इतका तो भांबावलेला होता.

''मला हे जाणून घ्यायचंय की, मी योग्य ठिकाणी पोहोचलोय की नाही. तू विशाल... विशाल लेलेच ना? १९७३ साली जन्मलेला. आणि आता दहावीत शिकत असलेला. होय ना?''

विशालला त्यानं आपल्याबद्दलची केलेली विधानं ऐकून फारच आश्चर्य वाटलं. काही न बोलता त्यानं नुसती होकारार्थी मान हलवली.

तो दहाफुटी पुन्हा बोलू लागला, ''आम्हा इतिहास संशोधकांचं एका मुद्यावर एकमत होत नव्हतं. माझ्यासह काहींना असं वाटतं की, कालप्रवासाचा पहिला प्रयोग करणारा माणूस तो तूच आहेस -- विशाल लेले. तूच पहिलं कालयंत्र तयार केलं आहेस. पण इतर काहींचं म्हणणं आहे की, कालयंत्राचा शोध २० व्या शतकातील नसून २१ व्या शतकातील आहे आणि त्याची जनक आहे अमेरिकेतील फ्लोरिडा ब्राऊन.''

''अरे हाट! हे पहा, मी बनवलेलं पहिलं कालयंत्र.'' विशाल आपलं श्रेय दुसरं कुणीतरी लाटतंय असं वाटल्यानं त्वेषानं म्हणाला.

नंतर त्यानं त्या दहाफुटीला त्याच्या कालयंत्राची माहिती द्यायला सुरुवात केली. तो दहाफुटी कालयंत्र न्याहाळत म्हणाला, ''अच्छाऽऽ तर हे आहे सर्वात पहिलं बनवलेलं कालयंत्र. वा!'' त्याच्या चेहऱ्यावर आनंद ओसंडत होता.

''पण या कालयंत्राचा संशोधक मीच आहे, हे निश्चित करण्यासाठी तुला इथं का यावं लागलं? हे काम तर तुम्हा पुढारलेल्यांना मागच्या कागदपत्रांच्या नोंदी पाहूनही करता आलं असतं. एवढा सोपा मार्ग सोडून हा द्राविडी प्राणायाम करायची काय गरज होती?'' विशालनं आश्चर्यमिश्रित कुतुहलानं प्रश्न विचारला.

त्यावर भुवया वर उंचावून तो दहाफुटी म्हणाला, ''सोपा मार्ग? हे तू म्हणतोयस? अरेरे!'' किती मागासलेले आहात असा भाव चेहऱ्यावर आणून तो पुढे बोलू लागला. ''तुमच्या काळात नवनवीन संशोधनाचं भांडार नुकतंच खुलं झालं होतं. तुम्ही नवनवे शोध लावत होता. अवकाश उड्डाणात प्रगती करीत होता. अवयव रोपण, टेस्टट्यूब बेबी-वनस्पती तुम्ही नव्यानेच निर्माण करायला लागला होता. ती सर्व माहिती झटक्यात मिळावी म्हणून तुम्ही संगणकाचा वापरही करू लागला होता. तेव्हा ही नुसती सुरुवातच असल्यानं तुम्हाला माहिती साठवणं अवघड गेलं नाही. पण आमच्या पुढं मात्र ही माहितीची दालनं एवढी खच्चून भरलीयत की, १०० व्या पिढीतील संगणकही योग्य ती माहिती देण्यासाठी बराच वेळ घेतो. आमच्या काळाच्या वेगाची बरोबरी करणं त्याला जमत नाही. आणि ही पद्धतही अत्यंत महागडी होत चाललीय. शिवाय जागाही व्यापली जाते ती वेगळीच. तसंच माहिती शोधून काढणंही अत्यंत किचकट झालंय. त्यापेक्षा कालप्रवास करणं जास्त सोपं अन् वेळेची बचत करणारं आहे. यात वेळेची बचत होते.''

''यापेक्षा आणखी सोपा मार्ग नाही का तुम्हाला शोधता येणार?'' विशालनं मध्येच प्रश्न केला.

''आमचा तसा प्रयत्न चालू आहे.'' तो दहाफुटी जरा खिन्नतेनं म्हणाला. ''सध्या आमचं एवढ्या बारीकसारीक गोष्टीत स्पेशलायझेशन झालंय की, प्रत्येकाची विशेषताही लक्षात ठेवणं कठीण झालंय. तरीही संशोधन न करणं हा काही त्याला पर्याय होऊ शकत नाही. शेवटी माणसाची जिज्ञासूवृत्तीच त्याला संशोधन करण्यासाठी भाग पाडते.

''असो. आता मला निघायलाच हवं. माझ्या कालयंत्रातील ऊर्जेचा साठा कमी होत आलाय. तो संपण्याच्या आत मला पोहोचलं पाहिजे. तसं माझं काम झालंच आहे.''

दहाफुटी एवढं बोलतोय तोच विशालची खोली पुन्हा एकदा प्रकाशानं उजळून निघाली. त्याचे डोळे दिपले गेले. आणि त्याच्यासमोर या पहिल्या दहाफूटी माणसासारखा दिसणारा चंदेरी कपडे घातलेला अजून एक माणूस उभा राहीला.

''अच्छा, तू इथं आला असशील याची कल्पना मला आलीच होती. म्हणून तर मी सरळ इकडेच आलो. मला गंडवणं एवढं सोपं नाही, काय

समजलास?'' आल्या आल्याच तो चंदेरी दहाफुटीशी हमरीतुमरीने बोलू लागला.

''कोण... कोण तुम्ही? इथे कसे काय आलात? या दहाफुटीशी तुमचा काय संबंध?'' विशालनं प्रश्नांच्या फैरी झाडल्या.

''हाच तो त्या फ्लोरिडा ब्राऊनचा वंशज, तुझं श्रेय लाटण्याचा प्रयत्न करणारा!'' चंदेरीला बोलण्याची संधी न देता दहाफुटी पटकन म्हणाला.

''मग माझ्या पणजीनेच तो शोध लावलाय. या फडतूस पोरानं नाही काही.'' चंदेरी आढ्यतेनं म्हणाला.

''माझ्याच घरात येऊन माझाच अपमान करतोस? तुमच्या तेविसाव्या शतकात तुम्ही सगळी अशीच उद्धटपणानं वागता वाटतं? माणुसकी नावाची चीज काही आहे की नाही?'' विशाल जरा तिरीमिरीत म्हणाला.

''ओह, चुकलो. मला क्षमा कर. पण ह्या दहाफुटीनं मला नुसतं पिडलंय.'' नरमाईच्या सुरात चंदेरीनं दिलगिरी व्यक्त केली.

''ठीक आहे. काय प्रॉब्लेम आहे तुमचा?'' विशालनं न्यायाधीशाच्या आवेशात विचारलं.

''मी म्हणतो कालयंत्राचा शोध माझ्या पणजीनं लावला. तर हा म्हणतोय तो तू लावलायस. त्याचं पेटंट अजूनही कुणी घेतलेलं नाहीय हे माझ्या लक्षात आलं म्हणून मी इतिहास संशोधन करू लागलो. तेव्हा कागदपत्रातून माझ्या पणजीनं ते यंत्र सरकारला बहाल केल्याचं लिहिलेलं दिसलं. जर मी आज त्याचं पेटंट घेतलं तर मला करोडो रुपये मिळतील आणि तेच या दहाफुटीला सलतंय. म्हणून तर तो ते श्रेय माझ्या पणजीला द्यायला तयार नाहीय.'' चंदेरी एका दमात बोलून गेला.

''हे पहा, आपल्या तिघांकडेही कालयंत्र आहे. तेव्हा आपण सरळ २१ व्या शतकातील तुझ्या पणजीलाच भेटायला जाऊ. म्हणजे हा सूर्य आणि हा जयद्रथ या म्हणीनुसार आम्ही समोरासमोर ठाकल्यामुळे सत्य काय ते कळेलच. कशाला हा वाद? काय?'' विशाल समजुतीच्या स्वरात म्हणाला.



''अरे हो, हे मला कसं सुचलं नाही आधी?'' दहाफुटी आश्चर्यानं स्वत:शीच म्हणाला.

''कारण तुम्हाला यंत्रासारखं काम करायची सवय झालीय. भावभावनांशी सांगड घालून काम करायचं तुमचा मेंदू विसरून गेलाय.'' विशाल म्हणाला.

''ठिकाय मग. चला तर जाऊ आपण तिच्याकडे.'' दहाफुटी घाई करू लागला. त्याच्यातील ऊर्जेचा साठा अगदी थोडाच उरला होता. अधनंमधनं एक लाल दिवा लागून त्याची जाणीव करून देत होता. ही गोष्ट चंदेरीच्याही लक्षात आली. त्याला ही उत्तम संधी वाटली. तो म्हणाला, ''हे पहा, तिच्याकडे जाण्यात काही अर्थ नाही. तिला असं उगीचच्या उगीच कुणीतरी येऊन त्रास दिलेला चालत नाही. तिच्याकडे भेटीसाठी आधी अपॉईंटमेंट घ्यावी लागते. माझी कागदपत्रं हा पुरावा ते सिद्ध करायला पुरेशी आहेत.''

''मला कळत नाही तुझ्यासमोर मी २० व्या शतकातला विशाल – कालयंत्राचा संशोधक या कालयंत्रासह उभा असतानाही तू ते श्रेय तुझ्या त्या पणजीला का देतो आहेस? ती फ्लोरिडा ब्राऊन तर माझ्यानंतर शंभर वर्षांनी जन्माला आली. कुठल्या तर्कात बसतं हे? आणि मी तिला भेटायला तयार असताना तू नकार का देतो आहेस? चल तिच्याकडे. जे खरं आहे ते तिच्याकडूनही वदवून घेऊ.''

''नाही! तुम्हाला मी तिच्यापर्यंत पोहोचू देणार नाही. कारण ते करोडो रुपये मला हवेत.''

''अच्छा म्हणजे तुझ्या मनात काही काळंबेरं आहे तर.'' दहाफुटी त्वेषानं म्हणाला, ''तू इथं आलास ते एकापरीनं बरंच झालं. तुला पण हे नक्की कळलं की, खरा संशोधक विशालच आहे. म्हणूनच तू तुझ्या पणजीकडे आम्हाला न्यायला तयार नाहीस. पैशासाठी तू कागदपत्रांत बेमालूम फेरफार केलेयस. आता पुन्हा आपल्या काळात परतल्यावर



तुझी धडगत नाही. फसवाफसवीच्या आरोपाखाली नाही तुला कैदेत पाठवलं तर बघ. इतिहास संशोधकाच्या नावाला काळिमा फासतोयस काय ? तुझंच तोंड काळं करतो बघ आता.''

''अरे जा ! ते तुलाही शक्य नाही. तू परत जाऊ शकशील तरच ना ?'' असं म्हणत चंदेरीनं विलक्षण वेगानं हालचाल केली. दहाफुटीच्या कालयंत्रावर, त्याच्या हातातील पिस्तुलासारख्या दिसणाऱ्या वस्तूतून प्रचंड वेगानं आगीचा लोळ जाऊन आदळला. जणूकाही आकाशातून पडणारी उल्काच ! क्षणार्धात ते कालयंत्र वितळून गेलं. चंदेरीच्या विद्युत वेगाच्या या कारभारानं ते दोघेही इतके भांबावून गेले की, चंदेरी कालयंत्रात बसून त्यांच्यासमोरून दिसेनासा कधी झाला याचं भानही त्यांना आलं नाही. भानावर आले तेव्हा हवेत चंदेरीचे शब्द घुमत होते,



''दहाफुटी, मर आता तिथेच. तुझी परतीची वाट मी बंद करून टाकलीय. आता मला आक्षेप घेणारा कुणीही उरला नाहीय. आता मी करोडो रुपयांचा मालक होणार. हाऽ हाऽ हाऽ...''

त्याचं विषारी हसणं दहाफुटीला एवढं झोंबलं की, तो विशालला म्हणाला, ''याला असा सहजासहजी सोडता कामा नये. हा माणूस महाबदमाश आहे. आमच्या शतकात कीड राहता कामा नये. विशाल मला जीवदान देणं आता तुझ्या हातात आहे. तुझ्या कालयंत्रातून तू मला घेऊन चल. माझा ऊर्जेचा साठाही अगदीच कमी शिल्लक राहिलाय. तू जर त्वरा केली नाहीस तर मी मरेनच, पण इतिहासात तुझंही नाव नामशेष होईल. त्या राक्षसाचं कारस्थान यशस्वी होईल.''

''तुला मदत करायला मला आवडलं असतं रे. पण हे कालयंत्र आत्ताच पूर्ण झालंय. मी अजून यातून कुठेच फेरी मारली नाहीय. त्यामुळे त्याच्या यशाची मला काहीच खात्री देता येत नाही. उगाच आपण जीव गमावून बसू, काही गडबड झाली तर.'' विशाल काळजीच्या सुरात म्हणाला.

''हे बघ, नाहीतरी माझा जीव जाणारच आहे. पण तू जर मदत केलीस तर तुझं नाव तर अजरामर होईलच, परंतु त्याहीपेक्षा महत्त्वाचं म्हणजे ह्या बदमाशाचं कारस्थानच त्याचं कबरस्थान होईल. खूप मोठं काम केल्याचं समाधान तुला मिळेल. नाहीतरी नुसतंच जगण्यापेक्षा काहीतरी भव्यदिव्य करून मेलेलं काय वाईट ? मरण तर काही कुणाला चुकत नाही. मग ते सन्मानानं तरी का स्वीकारू नये ? दुसरं असं की, तुला आमच्या काळातही येता येईल. आणि ते जग किती पुढारलंय हेही कळेल. नाहीतरी तू हे कालयंत्र पूर्ण झाल्यावर प्रयोग म्हणून कुठल्यातरी काळात जाणारच होतास ना ? मग ही संधी का सोडतोस ? एका दगडात दोन पक्षी मारता येतील. काळजी सोड आणि हो तयार,'' दहाफुटी विशालला समजावणीच्या सुरात म्हणाला.

विशाललाही त्याचं म्हणणं पटू लागलं होतं. त्यानं क्षणकाल काही विचार केला. आणि निर्णय पक्का केला. 'नाहीतरी प्रयोग म्हणून आपण कुठल्यातरी काळात जाणारच होतो. तर मग याच्याच बरोबर का जाऊ

नये ? त्याला जीवदान दिल्यासारखं होईल आणि आपणच कालयंत्राचे शोधक आहोत हेही सिद्ध होईल. आईबाबांना विचारून येऊया का? नकोच. ते परवानगी देणार नाहीत. कालयंत्र हे काळाच्या वेगानं जाणारं असल्यामुळं आपण जाऊन झटक्यात परत येऊ. त्यांना कळणार देखील नाही.''

विचारांतून बाहेर पडल्यावर तो दहाफुटीला म्हणाला, ''चल, बसूया ताबडतोब या यंत्रात.''

पण पहातो तो काय, तो दहाफुटी बेशुद्ध होण्याच्या अवस्थेत आला होता. त्याला धड उभंही राहता येत नव्हतं. विशालनं त्याला कसंबसं सावरलं आणि कालयंत्रात बसवलं. स्वत: तो कालयंत्राच्या खुर्चीवर बसला. समोरच्या संगणकावर त्याची बोटं फिरू लागली आणि त्यानं कालयंत्राचं ते विशिष्ट बटण दाबलं. खोली गरगरल्यासारखी वाटली. सगळी प्रमाणं बदलली. विशालला चक्कर आल्यासारखं वाटलं आणि क्षणभर त्याच्या संवेदनाच नाहीशा झाल्या. जणू तो क्षणासाठी निद्रिस्त झाला. आता कालयंत्र २३व्या शतकातील २२६७ सालात पोहोचत होतं.

एका भव्य पटांगणात ते थांबलं तेव्हा विशालला कुणीतरी जागं करीत होतं. ते विचित्र यान पाहून ती मंडळी विचारात पडली होती. हे वाहन कुठल्या ग्रहावरून आलंय ते त्यांना कळत नव्हतं.

जागं झाल्याबरोबर विशाल त्यांना म्हणाला, ''आधी या दहाफुटीकडं बघा. त्याला शुद्धीवर आणा. मग आपण बोलू.''

दहाफुटीला त्यांनी ताबडतोब ओळखलं. ''अरे! हा तर आपला माणूस. हा कसा काय या यानात आला ? हे काय गौडबंगाल आहे ?'' अनेक आवाज कुजबुजू लागले.

थोड्यावेळानं तो दहाफुटी शुद्धीवर आला – म्हणजे त्याला पुन्हा चार्ज केलं गेलं. त्याच्यात ऊर्जेचा साठा भरला गेला. त्याच्याकडून मग सगळी हकीकत कळली. त्या तळावरचा मुख्य विशालचं स्वागत करण्यास पुढे झाला.



''विशालचा विजय असो. आम्ही तुमचे हार्दिक स्वागत करतो. आणि अभिनंदनही.''

विशालनं त्याच्याशी हस्तांदोलन केलं.

''आता थोडा वेळ आराम करा. मग आपण बाहेर पडू.'' असं ते मुख्य म्हणताहेत तोवर त्यांच्यासमोर त्या चंदेरीला हातकड्या घालून पोलीस येताना दिसले. विशालला कळेना की इतक्या झटपट कशी कारवाई झाली ते. त्याच्या ताबडतोब लक्षात आलं की, तो तेविसाव्या शतकात आलाय. इथं सगळीच कामं प्रचंड वेगानं होत असतात.

चंदेरीचा चेहरा उतरला होता. विशालला तिथं पाहून त्याच्या सारं काही लक्षात आलं होतं. त्याला त्याच्या कर्माचा प्रश्चात्ताप होत होता. विशाललाही त्याची कीव आली. तो मुख्यांना म्हणाला, ''जर ह्याला आपल्या कृत्याचा पश्चात्ताप होत असेल तर पुन्हा अशी फसवेगिरी न करण्याच्या हमीवर त्याला सोडून देता नाही का येणार ? एवढ्या हुशार माणसाचा असा अंत व्हावा हे काही मला पटत नाही.''



''जो तुमच्याच शोधाचं श्रेय लाटायला बघत होता त्याच्यावरच तुम्ही दया करता? आणि सोडायला सांगता? आश्चर्यच आहे!'' मुख्य म्हणाला.

''हे पहा माणसं चुका करतात. पण त्यांना जर शहाणपण यायचं असेल तर त्यांच्या काही चुका माफ करायला हव्यात. त्यातच खरी माणुसकी आहे.''

विशालच्या ह्या तत्त्वज्ञानाने २३ व्या शतकातील ती पुढारलेली माणसं चक्रावली.

''नाहीतरी आता सिद्ध झालंच आहे ना, की मीच या कालयंत्राचा संशोधक आहे म्हणून.'' विशाल म्हणाला.

''ते ठीक आहे हो. पण याने आमच्या दहाफुटीला जीवे मारण्याचा प्रयत्न केला त्याचं काय? तुम्ही नसती मदत केली तर त्याला नाहक प्राणाला मुकावं लागलं असतं. म्हणून ह्याला असा सहजासहजी सोडून चालणार नाही.'' मुख्य त्याला सोडायला तयार नव्हता.

''ठीक आहे. तुम्हाला योग्य वाटेल ते करा.'' असं म्हणून विशालनं तो विषय तिथेच बंद केला.

''चल, विशाल तुला आमचं गाव दाखवतो.'' दहाफुटी विशालला म्हणाला.

''चल, सगळ्यात पहिल्यांदा मला इथली शाळा दाखव.''

''आमच्या इथे शाळा नसतात.''

''काय? शाळा नसतात? मग इथली मुलं शिकतात कुठं? की शिकतच नाहीत? पण असं कसं शक्य आहे?'' विशालनं भराभर अनेक प्रश्न विचारले.

''अरे, २३ व्या शतकात शाळेची गरजच काय? प्रत्येकजण आपापल्या घरी बसूनच शिकत असतो – संगणकावर. सर्व विषयांचा इयत्तावार अभ्यासक्रम विशिष्ट तबकड्यांमध्ये प्रोग्रॅम करून दिला म्हणजे झालं.''



''पण ते शिकत असताना त्यांना काही शंका आणि प्रश्न पडले तर ते कोणाला विचारणार? आमच्याकडे निदान शिक्षकांना तरी विचारायची सोय होती. इथं?''

''विद्यार्थ्याला जे जे काही प्रश्न पडतात त्याची यादी संगणकाला द्यायची. त्यातील बरीचशी उत्तरं – म्हणजे जवळ जवळ सगळीच समज ना – संगणकच देऊन टाकतो. जे उत्तर त्याला येत नाही ते मग तो त्याच्या मुख्य केंद्रातील संगणकाकडून मिळवून नंतर त्या विद्यार्थ्याला देतो.''

''म्हणजे इथं शिक्षक हा कुठेही नसतो म्हणायचा.''

''असतो ना. तोच तर संगणकाच्या सहाय्याने अभ्यासक्रम तयार करतो. आणि विशिष्ट तबकड्या तयार करून ठेवतो. म्हणजे शिक्षकाचा सरळ विद्यार्थ्यांशी संबंध येत नसला तरी अभ्यासक्रम तयार करण्यासाठी त्याची गरज लागतेच.''

''अरे, पण सगळ्याच विद्यार्थ्यांना असा अभ्यासक्रम जमणं कठीण नाही का? काही कमी बुद्धीचे असतात तर काही जादा बुद्धिमत्तेचे.''

''छे आमच्याकडे असा प्रकारच नाही. आम्ही कमी बुद्धीची मुलं जन्मालाच येऊ देत नाही मुळी.''

''काय?'' आता आश्चर्य करण्याची पाळी विशालची होती.

''हो. जन्मापूर्वीच त्या मुलाच्या पेशींचा अभ्यास करून त्यात कमी प्रमाणात असलेल्या जीनसूचं इंजेक्शन देऊन त्या त्या वाढवल्या जातात. मग जन्माला येणारं मूल हे बुद्धिमानच निपजतं.''

''बरं, आता असं सांग की शाळा नाहीत म्हणजे त्यांना शारीरिक शिक्षणाचाही तास नसेल. मग ही मुलं व्यायाम करतात की नाही? या मुलांना मित्र-मैत्रिणी आहेत का? ती खेळतात कोणाबरोबर?''

''व्यायामाचं शिक्षणही संगणकाच्या आणि दूरदर्शनच्या सहाय्यानं दिलं जातं. त्याचे ठराविक तास पूर्ण करावेच लागतात.''

''पण तो व्यायाम करतोय की नाही हे कसं कळणार?''

''आमच्या युगातल्या साऱ्या दूरदर्शन संचावर एक कॅमेरा बसवलेला असतो. या कार्यक्रमाच्यावेळी दूरदर्शनचा हा कॅमेरा चालू होतो. त्यामुळे त्या घरातील चित्र मुख्य केंद्रावर दिसण्याची सोय केलेली असते. तेथील अधिकाऱ्याकडे संबंधित विद्यार्थ्यांची यादी असते – तीही संगणकात. त्याच्या साहाय्याने तो कोणतंही घर तपासू शकतो.''

''याचा अर्थ त्या घरातलं सगळंच दिसू शकतं तुम्हाला ?'' विशाल म्हणाला.

''हा संपर्क फक्त या कार्यक्रमापुरताच मर्यादित असतो. इतर वेळी तो साधता येत नाही.''

''पण मग सांघिक खेळांचं काय ?''

''सांघिक खेळ खेळायला वेळच कुठे असतो त्यांना ? अभ्यासातनं फारच थोडा वेळ फुरसत मिळू शकते त्यांना.''

''यामुळे मुलं कदाचित ज्ञानी होतही असतील. पण माणसामाणसातील संबंध मात्र दुरावतात हे नक्की.''

''प्रत्येक व्यक्ती एवढी बिझी असते इथे की तसे संबंध वाढवायला, गप्पा करायलाही त्यांना वेळ मिळणं अशक्य आहे.''

''बरं, आता आपण कुठल्या शहरात आहोत? इथला एखादा कारखाना तरी दाखव.''

''आपण शहरात नसून एका खेड्यात आहोत.''

''कमाल आहे. या खेड्यात हवाई मोटारी (हवेतून प्रचंड वेगानं पळणाऱ्या मोटारी. अर्थातच संगणकावरून) ये-जा करताहेत. सगळी ठिकाणं झगमगताहेत, संगणकांची रेलचेल आहे. प्रत्येक घर अत्याधुनिकतेचं प्रतीक दिसतंय. इलेक्ट्रॉनिक उपकरणांनी सर्व संबंध क्षणात जुळतात. याला खेडं म्हणायचं ? मग आमची मुंबई – एवढं मोठ्ठं शहर समजतो आम्ही – ती ह्या खेड्यापुढे अगदीच 'ही' वाटतेय. मग तुमचं शहर असतं तरी कसं ?''



''खरं सांगू, हल्ली खेडी आणि शहरं असं वेगळं काही राहिलेलंच नाही. सगळी गावं एकाच पातळीवर आहेत. कारखान्यात यंत्रमानव कामं करतात ती खेड्यात असं म्हणू फार तर. शहरात सगळंच घरी बसून ती ती व्यक्ती नेमलेलं काम करते. आणि घरातूनच मुख्य केंद्रांशी संपर्क साधते. तसंच सगळ्या गोष्टी संगणकामार्फत मुख्य केंद्रात एकत्रित केल्या जातात. अगदीच आवश्यकता भासली तर व्हिजी फोनचा वापर करून प्रत्यक्ष त्या त्या व्यक्तीशी बोलणं केलं जातं.'' (व्हिजी फोन म्हणजे दूरदर्शन आणि दूरध्वनी यांचा संकर करून तयार केलेलं उपकरण. या फोनवर ज्या व्यक्तीशी बोलायचंय ती दूरदर्शनच्या पडद्यावर दिसू लागते. आणि मग संभाषण समोरासमोर केल्यासारखं होतं.)

''याचा अर्थ माणसं कामालाही जात नाहीत आणि फारशी कुणाशी बोलतही नाहीत. हेऽ हेऽ जरा अतीच होतंय हं. अरे, तुमच्या माणसांना मन तरी आहे की नाही ? तुम्ही त्यांना मन मोकळं करायला कुठलीच जागा ठेवलेली नाही. ही तर शुद्ध अप्रत्यक्ष कैद आहे. तुम्हाला या विरुद्ध बंड करावंसं नाही वाटत ?'' विशाल वैतागून म्हणाला.

''तसं नाही रे, त्यांना करमणुकीसाठी कितीतरी वेगवेगळी साधनं आहेत ना! पण त्या ठिकाणी फक्त सुटीच्याच दिवशी जाण्याची मुभा असते. इथं सारं कसं शिस्तबद्ध असते.'' दहाफुटी समर्थन करीत म्हणाला.

''मला हे मान्य आहे की सतत काम आणि काम करून तुम्ही प्रचंड प्रगती केलीय. परग्रहावरील जीवसृष्टीशी संपर्कही साधलाय. पण या ज्ञानाच्या विस्तारलेल्या वृक्षात तुमची मनं मात्र मुर्दाड झालीयत, असं नाही वाटत तुम्हाला ?''

''मला तर आताच कंटाळा यायला लागलाय. मी आपला चाललो घरी.''

''बस्स, एवढ्या लवकर ? तुला अजून बरंच काही दाखवायचंय.''

''नको. ती नुसती यंत्रं आणि यांत्रिक माणसं बघण्यापेक्षा, माझ्या हाडामांसाच्या माणसांना की ज्यांना मन आहे त्यांना भेटण्यास मी अधीर झालोय. बराय. निघतो मी.''

असं म्हणून विशाल आपल्या कालयंत्रात बसला. तेवढ्यात तो दहाफुटी म्हणाला, ''अरे, एक क्षण थांब. तू मला जीवदान दिलंस त्याबद्दल तुला एक अल्पशी भेट द्यायचीय.'' असं म्हणून त्यानं खिशातून एक लहानशी चपटी डबी काढली आणि त्याच्या हातावर ठेवली.

''काय आहे हे?'' विशालनं विचारलं.

''हा आहे 'वैश्विक दुभाष्या'. तुझं आणि माझं संभाषण या डबीमुळेच होऊ शकलं. कोणत्याही शतकातील भाषा हा आमच्या भाषेत किंवा आपल्याला हव्या त्या भाषेत त्वरित भाषांतरित केली जाते ह्यात. हा ठेव तुझ्याजवळ. म्हणजे तू कोणत्याही काळात गेलास तर तुला भाषेची आणि संभाषणाची अडचण पडणार नाही.''



विशाल त्या लहानश्या वैश्विक दुभाष्याकडं निरखून आणि कुतूहलानं पहात होता. दहाफुटीने त्याला तो कसा हाताळायचा याची माहिती दिली.



''धन्यवाद. भेटू पुन्हा कधीतरी'' म्हणत विशालनं त्याचा निरोप घेतला. कालयंत्रातील संगणकावर बोटं फिरवली. आणि क्षणार्धात तो त्याच्या घरात आला.

त्याची आई बंद दरवाजावर जोरजोरात धक्के मारत, ''विशाऽल, विशाल'' म्हणून हाका मारत होती. विशालनं दार उघडलं.

''काय आहे ग आई?'' विशालनं विचारलं.

''अरे, केव्हापासून दार ठोठावतेय. काय करत होतास आतमध्ये एवढं? जेवायचं नाही का?'' आई काळजीने म्हणाली.

''बरं चल.''

आज विशाल एवढ्या पटकन तयार झाला हे पाहून तिला नवल वाटलं. दररोज जेवायची टाळाटाळ करणारा विशाल आज आनंदात लगेच कबूल झाला कसा याचा अचंबा करीत ती स्वयंपाकघराकडे वळली. तिला बिचारीला काय माहीत की, विशालचं संशोधन पूर्ण होऊन तो २३ व्या शतकात जाऊन आला ते?

विशालनं जेवताना बाबांना सांगितलं, ''बाबा, मी किनई, माझ्या कालयंत्रातून २३ व्या शतकात जाऊन आलो. काय प्रगती केलीय हो त्या माणसांनी! सगळीकडं इलेक्ट्रॉनिक्सनं बाजी मारलीय... हवाई मोटारी काय, वैश्विक दुभाष्या काय, संगणकाचे अगणित चमत्कार काय, व्हिजी फोन काय, काही विचारूच नका. नुसतं थक्क व्हायला होतं. पण माणसं मात्र यंत्रवत झालीयत्. ते बाकी आवडलं नाही मला.''

''काहीतरी विचित्र खूळ भरून राहिलंय तुझ्या डोक्यात. असं कधी भविष्यकाळात जाता येतं का? म्हणे कालयंत्र बनवलंय!''

''अहो, खरंच सांगतोय मी. हा पहा वैश्विक दुभाष्या. त्यांनी मला भेट दिलेला.'' असं म्हणून विशालनं बाबांना डबी दाखवली.

डबी हातात् घेत निरखून पहात बाबा म्हणाले, ''साधी तर दिसतेय. काहीतरी वेड्यासारखं बरळतोयस झालं.''

विशलला कळेना बाबांना कसं समजवावं ते. बाबा मात्र विचार करत होते, याला लवकरच मानसोपचार तज्ज्ञाकडे न्यायला हवं.

नाहीतर यांचं वेड वाढत जाईल. वरकरणी मात्र ते म्हणाले, ''ठीक आहे.''

तेवढ्यात विशालला आठवलं. दहाफुटीचं कालयंत्र त्याच्या खोलीत वितळून पडलं होतं ते. तो बाबांना म्हणाला, ''चला तुम्हाला आणखी एक पुरावा दाखवतो. माझ्या संशोधनाचं श्रेय लाटणाऱ्या चंदेरीनं त्या दहाफुटीचं कालयंत्र माझ्याच खोलीत वितळवलंय. ते पहा.''

बाबांना कळेना हा काय बडबडतोय ते. पण ते त्याच्याबरोबर निघाले. खोलीत येताच विशालनं त्यांना ती जागा दाखवली. तिथं एखादं रसायन सांडल्यावर जसा डाग पडतो तसा डाग पडलेला दिसला त्यांना. तरीही विशालच्या समजुतीखातर ते नुसते हसले. मनात मात्र विचार केला की ताबडतोब मानसोपचार तज्ज्ञाची वेळ ठरवून घ्यायला हवी. नाहीतर हा आणखी काहीतरी विचित्र करून बसेल. एका बाजूला बाबांना त्याने कालयंत्र म्हणून तयार केलेल्या खेळण्यातील यानाची प्रतिकृती पाहून त्याचं कौतुक वाटत होतं तर दुसऱ्या बाजूनं मात्र त्यांना चिंता वाटत होती. ते काही न बोलता बाहेर आले आणि विशाल पुन्हा कालयंत्राची पहाणी करू लागला. सारं काही ठाकठीक होतं.

विशालनं डोळे मिटून घेतले आणि काही वेळ शांत पडून राहिला. डोळे पुसताना त्याच्या हाताला गळ्यातील डबीचा स्पर्श झाला. डोळे उघडून पुन्हा तो त्या डबीकडे निरखून पाहू लागला. त्याच्या मनात विचार आला, आता आपणच आपल्या कालयंत्रातून भूतकाळात फेरफटका मारून का येऊ नये? या विचारासरशी त्यानं कालयंत्राच्या खुर्चीवर बैठक मारली आणि समोरच्या संगणकावर आकडे फिरवू लागला. कालयंत्राचं ते विशिष्ट बटण दाबलं. त्याला आर्किमिडीजला भेटायचं होतं. २२६५ सालापूर्वीच्या पुरातन ग्रीक शहरात – सिरीकसमध्ये कालप्रवास करून यायचं होतं.

विशालला चक्कर आल्यासारखं वाटलं. त्याची खोली गरगर फिरल्यासारखी त्याला वाटली. सगळी प्रमाणं बदलली. वस्तू प्रथम चपट्या आणि नंतर लगेचच लहान लहान होऊ लागल्या. इतक्या सूक्ष्म



की, विशालला त्या डोळ्यांनीही दिसेनात. त्यालाही प्रचंड दडपण आल्यासारखं वाटलं. त्यानं पटकन् डोळे मिटून घेतले.

जेव्हा त्याचं कालयंत्र गुळगुळीत दगडगोट्यांनी बनवलेल्या घरासमोर थांबलं तेव्हा त्याला हलकासा झटका बसला. तो यंत्रातून इकडे तिकडे पाहू लागला. त्या घराच्या ऐसपैस ओसरीवर त्याला एक रुंद खांद्याचा, भरपूर दाढी राखलेला, डोळ्यात बुद्धिमत्तेचं तेज असलेला ऋषितुल्य माणूस दिसला. तो कंपास हातात घेऊन गणितातील कुठल्यातरी कूट प्रश्नात गुंतलेला होता.

''तुम्हाला तुमचा प्रश्न सुटण्यात यश मिळो.'' विशाल त्याच्याजवळ जात म्हणाला. वैश्विक दुभाष्यानं तत्काळ ग्रीक भाषेत रूपांतर केलं. ''तुम्ही मला त्या महान माणसाचं – आर्किमिडीजचं घर कुठे आहे ते दाखवू शकाल काय?''

''तुम्हाला त्याच्याकडून काय हवंय?'' तो माणूस जरा रागानंच म्हणाला. विशालला असंही दिसलं की, तो आलेला अथवा त्याचा दुभाष्या पाहून त्याला काडीचंही आश्चर्य वाटलेलं नाही.

''मला त्याच्याशी बोलायचंय. त्याने आर्किमिडीजचं तत्त्व कसं शोधून काढलं; मोठमोठ्या संख्यांची वर्गमुळं शोधून काढायची पद्धत कशी...''

विशालचं वाक्य अर्धवटच राहिलं. कारण त्या ग्रीक माणसाचा चेहरा संतापानं नुसता फुलला होता. तो अशा आवाजात बडबडला की, विशालचा दुभाष्याही त्याचं भाषांतर करण्यास असमर्थ ठरला.

''माझं... माझं काय चुकलं? मला तर त्याची फक्त भेट—''

''त्याची भेट? किती लोक येणार आहेत त्याची भेट घ्यायला? अन् तेच ते प्रश्न विचारणार आहेत? एवढं बोलून त्या ग्रीक माणसानं वैतागानं त्याच्या हातातला कंपास विशालच्या दिशेनं भिरकावला. विशाल सावध होता म्हणूनच बचावला. पण त्याला या माणसाचा आता राग आला होता. तो तारसप्तकातच ओरडत बडबडू लागला, ''तुम्ही रानटी आहात. आम्हाला पुरातन ग्रीकांच्या सहिष्णु वागणुकीविषयी

शिकवलं गेलंय. पण... पण इथं तर रानटीपणाचा कहर आहे. काही तरी चूक झालीय आमच्या इतिहास संशोधकांकडून. नक्कीच. आर्किमिडीज कुठाय हे विचारणं काय गुन्हा आहे ?''

''मीच तो आर्किमिडीज.'' तो ग्रीक माणूस दिलगिरीच्या स्वरात म्हणाला, ''मला क्षमा कर अनोळखी पोरा. तुला इजा करण्याची माझी इच्छा नव्हती. पण काय करू, आजपर्यंत सतत तुझ्यासारखी अनेक अनोळखी माणसं येऊन गेली. येऊन तेच तेच प्रश्न विचारत बसतात. मग मानसिक तोल ढळणार नाही तर काय ?''

विशालही थोडा शांत झाला. त्यानं नम्रपणे विचारलं, ''थोडा वेळ तुमच्या तत्त्वाविषयी गप्पा मारायला द्याल का ? आम्हाला ते अभ्यासाला आहे – आमच्या दहावीच्या बोर्डाच्या परीक्षेला.''

''बरं, मला असं सांग. तू पाण्यात हात बुडवलास तर तुला तो हलका वाटतो ना ? तसंच पाण्याची पातळीही वर चढलेली दिसते ना ?''





''हो. खरंय तुमचं म्हणणं.''

''बस्स. ह्या निरीक्षणावरूनच तर मी माझा नियम तयार केला. कोणताही पदार्थ पाण्यात पूर्णपणे वा अंशत: बुडवला असता त्याच्या वजनात घट येते. आणि ही घट त्याने विस्थापित केलेल्या पाण्याच्या वजनाइतकी असते.''

''यालाच आम्ही आर्किमिडीजचं तत्त्व म्हणतो. आमच्या अभ्यासक्रमात ते आहे नं!''

विशालचं हे बोलणं ऐकल्यावर आर्किमिडीजच्या चेहऱ्यावर आपण अजरामर झाल्याचा आनंद दिसू लागला.

विशाल त्याला आणखी काही प्रश्न विचारणार तोच त्याच्याजवळील इलेक्ट्रॉनिक उपकरणानं त्याला सूचना दिली की, त्याच्याजवळचा ऊर्जेचा साठा संपत आला आहे. तेव्हा तो निघायची घाई करू लागला. जाता जाता आर्किमिडीजला तो म्हणाला, ''तुम्हाला, तुमचं भविष्य ऐकायचंय ?'' आर्किमिडीजच्या चेहऱ्यावर विशालला उत्सुकता दिसली. तो सांगू लागला, ''तुम्ही यंत्रशास्त्रात आणि भूमितीत अनेक शोध लावणार आहात. तुम्ही प्रक्षेपणशास्त्रातही प्रगती कराल. सारे नागरिक तुमच्यावर अलोट प्रेम करतील. युद्धात तुमच्यामुळे विजय होईल. पण... पण...'' असं म्हणून विशाल एक क्षणभर थांबला.

''अरे, पण काय ? सांग ना लवकर.'' आर्किमिडीजनं कमालीच्या अधीरतेनं विचारलं.

''पण तुमचे शत्रुसैनिक, तुम्ही वाळूवर कूट प्रश्नाचा गुंता सोडवण्याच्या तंद्रीत असताना, तुम्हाला मारून टाकतील. आणि मरताना तुम्ही एकच वाक्य ओरडून सांगाल की, 'माझ्या कूट प्रश्नाला कुणीही हात लावू नका.'

क्षण दोन क्षण शांततेत गेले. विशालनं विचारलं, ''असं अपघाती मरण येण्यापेक्षा तुम्ही माझ्या सोबतच का नाही येत या कालयंत्रात बसून ?''

''नाही.'' अर्किमिडीज मिश्कीलपणं हसत म्हणाला, ''हे शक्य नाही. अरे, माझ्या राजाला युद्धात माझ्या हातून जर भरघोस मदत होणार असेल आणि जय मिळणार असेल तर माझा मृत्यू समोर दिसत असला तरी बेहत्तर, मी मातृभूमीसाठी बलिदान करीन. पण स्वतःचं आयुष्य वाढवण्यासाठी पळपुटेपणा करून भ्याडपणा दाखवू म्हणतोस! छे! कदापि शक्य नाही.. तू जाऊ शकतोस.''

विशाल घाईत कालयंत्रात चढला. दोघांनी निरोपाचे हात हलवले. कालयंत्रात बसल्यावर त्यानं विचार केला आता कुठं जावं? त्याला लगेच आर्किमिडीजचं मातृभूमीविषयीच्या आत्मविश्वासानं दिलेलं उत्तर आठवलं. अन् त्यानं आपल्याच घरी जायचा निर्णय घेतला.

त्यानं संगणकावर आकडे फिरवले १ ऑक्टोबर १९८८, कालयंत्र सुरू करायचं बटण दाबलं. कालयंत्र गरगर फिरू लागलं. वस्तू लहान लहान होताना दिसू लागल्या. त्याच्यावर दडपण येऊ लागलं. हळूहळू त्याच्या अस्तित्वाची जाण नाहीशी होऊ लागली.



# गर्वाचे घर

हजार वर्षांपूर्वीची गोष्ट आहे. एक राजा होता. नुसता साधासुधा राजा नाही तर सम्राटच म्हणा ना. अर्धा भारत व्यापेल एवढ्या भल्या मोठ्या प्रदेशावर त्याचं राज्य होतं. त्याची संपत्तीही अमाप होती. हिरे, माणकं, मोती, सोनं, चांदी यांच्या राशीच्या राशी भरून कोठारं होती. ही सर्व संपत्ती आपली आहे हे पाहून तो भलताच खूष व्हायचा. त्याला आपल्या संपत्तीबद्दल एवढा गर्व होता की, त्याला वाटायचं या जगातील सर्वात श्रीमंत माणूस मी एकटाच आहे. माझ्याएवढी संपत्ती कुणाकडेच नाही. तरीही त्याची संपत्ती साठवण्याची हाव दिवसेंदिवस वाढत होती. तो गोरगरीब जनतेकडून त्यांची पिळवणूक करून संपत्ती साठवत असे. त्यामुळे जनता रंजली-गांजली होती. राजाच्या या लोभी स्वभावामुळे त्यांना जगणंही मुष्किल झालं होतं.

राजा नेहमी दरबारात परदेशी पाहुण्यांसमोर आपल्या संपत्तीविषयी बढाई मारत असे. सारे दरबारीही त्याच्या हो ला हो मिळवत. ते पाहुणे मग राजाच्या श्रीमंतीची कीर्ती दूरवर पसरवीत.

असेच दिवस जात होते. एके दिवशी एक साधू त्या राजाच्या नगरात आला. खरं तर हा एक मोठा गाढा विद्वान होता. गणितज्ञ होता. त्याने राजाची भेट मागितली. त्याला वाटले, एवढा मोठा सम्राट! त्याने जर आश्रय दिला तर आपली जन्माची ददात मिटेल. ही वणवण संपेल.

राजाला मात्र वाटले, हा कोण फाटक्या अंगाचा माणूस, सरळ येऊन भेट मागतो. परदेशी नागरिक काहीतरी नजराणा घेऊन येतात. आणि हा तर रिकाम्या हाताने आलाय. राजाने भेट टाळण्याच्या उद्देशाने निरोप पाठवला.

'त्याला म्हणावं, राजाची भेट हवी असेल तर, काहीतरी मोठा नजराणा घेऊन ये.'

त्या साधूने पुन्हा निरोप पाठवला की, 'माझ्याकडे एक अलौकिक संपत्ती आहे. तिचे मोल तुझ्याकडच्या सोन्यानाण्याच्या ऐहिक संपत्तीत करता येणार नाही. तू जर मला पदरी ठेवलंस तर ही अलौकिक संपत्ती मी तुला नजराणा म्हणून देईन.'

राजा साधूचा हा उद्दामपणा पाहून संतापला. संतापाने थरथर कापत त्याने आज्ञा केली, 'आणा त्याला माझ्यासमोर. माझ्या संपत्तीला कमी लेखतो! मग दाखव म्हणावं माझ्यापेक्षा जास्त संपत्ती असलेला माणूस.'

सारे दरबारी मनातून समजले की, आज त्या साधूचं धड काही शिल्लक राहणार नाही. सारी सभा शांत होऊन पुढचा प्रसंग पाहण्यास तयार झाली.

तेवढ्यात समोरून भगवी कफनी घातलेल्या तेज:पुंज, हसऱ्या चेहऱ्याच्या त्या साधूने दरबारात प्रवेश केला.

'राजा, तुझे कल्याण असो.' प्रवेशताच त्यानं राजाचं अभीष्टचिंतन केलं. दरबारी त्याच्या प्रवेशानं मंत्रमुग्ध झाले. असा चेहरा त्यांनी यापूर्वी कधीच पाहिला नव्हता. काही दरबाऱ्यांच्या चेहऱ्यावर मात्र, आज याची धडगत नाही म्हणून कीव पसरलेली होती.

'ए गोसावड्या.' राजाच्या या हाकेने सारा दरबार तटस्थ झाला. साधू मात्र तरीही चेहऱ्यावरचं हास्य कायम ठेवून शांतपणे राजासमोर उभा होता.



'माझ्याकडे असलेल्या संपत्तीपेक्षा तुझ्याकडे काय मोठी संपत्ती आहे रे? अरे, या भूतलावर माझ्याएवढा श्रीमंत माणूस नाही. आणि तू तर फाटक्या अंगाचा, तरीही एवढी मिजास?

राजाच्या या तुच्छतेच्या बोलण्यावर स्मित करीत तो साधू पुन्हा ठामपणे म्हणाला, 'महाराज, ऐहिक संपत्तीपेक्षा ज्ञानाची संपत्ती सर्वात श्रेष्ठ असते. अमर्याद असते. या ऐहिक संपत्तीला शेवटी कुठेतरी मर्यादा असतात. तुला तुझी संपत्ती अगणित वाटली तरी ती शेवटी सीमितच आहे.'

राजाचा संताप ऐहिक सुखानं पोसलेल्या चेहऱ्यावरून नुसता ओसंडून जाऊ लागला. साधूचे आपल्या संपत्तीबद्दल तुच्छतेचे उद्‌गार ऐकून रागाने लाल होत तो म्हणाला,

'तू हे सिद्ध करून दाखव की माझी संपत्ती अगणित नाही. नाहीतर तुझं शिर धडावेगळं केलं जाईल.'

राजाज्ञा सुटली.

साधू म्हणाला, 'ठीक आहे. त्यासाठी कमीत कमी एक महिन्याची मुदत हवी आणि मी सांगतो त्याप्रमाणे व्हावं.'

राजा म्हणाला, 'बरंय, तू सांगतोस त्याप्रमाणे होईल. मग संपत्तीची मोजदाद करायला केव्हा सुरुवात करतोस?'

राजाच्या या उतावळ्या प्रश्नाकडे दुर्लक्ष करीत साधू म्हणाला, 'संपत्तीची मोजदाद करायची गरज नाही. आपण दोघांनी मोहरांची देवाण घेवाण करायची म्हणजे झालं. तुला आधी काय करायचं ते स्पष्ट करून सांगतो. आजपासून दररोज एक महिन्यापर्यंत म्हणजे तीस दिवस मी तुला ५००० मोहरा देईन. त्या बदल्यात तू मला एका मोहरेपासून सुरुवात करून दररोज त्या मोहरांच्या दुप्पट मोहरा द्यायच्या.'

राजा ही अट ऐकून आनंदितच झाला. एका मोहरेच्या बदल्यात ५००० मोहरा. दरबारीही साधूला खुळ्यात काढू लागले. हा नाहक मरणार म्हणून काही हळहळलेही.

'मंजूर. चल कर सुरुवात.' राजा अत्यानंदाने बोलला. पहिल्याच दिवशी साधूने ५००० मोहरा दिल्या, त्याबदली एक मोहोर घेतली. दुसऱ्या दिवशी पुन्हा पाच हजार मोहरा देऊन दोन मोहरा घेतल्या, तिसऱ्या दिवशी चार मोहरा, चौथ्या दिवशी आठ मोहरा, पाचव्या दिवशी सोळा मोहरा, सहाव्या दिवशी ३२ मोहरा, सातव्या दिवशी ६४, आठव्या दिवशी १२८, नवव्या दिवशी २५६, दहाव्या दिवशी ५१२ मोहरा साधूला तर राजाला या दिवसापर्यंत ५०००० मोहरा मिळाल्या होत्या. राजा खुष होता.

अकराव्या दिवशी राजाने १०२४ मोहरा, बाराव्या दिवशी २०४८... तेराव्या दिवशी ४०९६... चौदाव्या दिवशी ८१९२... पंधराव्या दिवशी १६३८४... सोळाव्या दिवशी ३२७६८... सतराव्या दिवशी ६५५३६... अठराव्या दिवशी दुप्पट म्हणजे १३१०७२... एकोणिसाव्या दिवशी २६२१४४... विसाव्या दिवशी ५२४२८८. एवढ्या मोहरा राजाने दिल्या आणि त्या बदल्यात त्याला दररोज ५००० प्रमाणे फक्त १,००,००० मोहरा मिळाल्या.

राजाला आता त्यातली गोम कळून चुकली. पण दिलेला शब्द मोडणार कसा? भर दरबारात ही देवाण घेवाण चाललेली होती. जर बंद केली तर आपल्या दरबाऱ्यांसमोर आपली मानहानी होईल. तेव्हा आणखी दहा दिवस तर उरलेयत; पाहूया काय होते ते, असा त्याने विचार केला. इकडे दरबाऱ्यांच्याही लक्षात साधूची बुद्धिमत्ता आली होती.

उरलेले दहा दिवस तेच चाललं होतं. साधूने दररोज पाच हजार मोहरा द्यायच्या आणि राजाने आदल्या दिवसाच्या दुप्पट मोहरा द्यायच्या. २९ व्या दिवशी तर राजाची सगळी भांडारे ओस पडली. आता उद्या काय द्यायचे हा प्रश्न राजासमोर उभा राहिला, कारण तिसाव्या दिवशी त्याला ५३,६८७०,९१२ एवढ्या मोहरा द्यावयाच्या होत्या. शेवटी संपूर्ण राज्यातून असेल नसेल ती संपत्ती गोळा करून राजाने साधूच्या पुढे टाकली आणि त्याच्या पायाशी लोटांगण घालत म्हणाला,



'महाराज, क्षमा करा, मी चुकलो. संपत्तीचा गर्व करून मी उन्मत्तपणे वागत होतो. आज मी पुरता कंगाल झालो आहे. आता माझं जीवन तुमच्याच हाती आहे. मला समजलं की ज्ञानाची श्रीमंती पैशाच्या श्रीमंतीपेक्षा श्रेष्ठ आहे. क्षमा असावी.'

साधूने राजाला उठवत सांगितले, 'राजा, अरे, मी कोण क्षमा करणार? तुलाच तुझी चूक कळली आणि तुला पश्चात्ताप झाला म्हणजे तूच तुला क्षमा केलीयस. आम्ही फक्त निमित्तमात्र. स्वत:ची चूक कळणे हीच खरी शिक्षणाची पहिली पायरी होय. आणि हे बघ, ही सारी संपत्ती मला नकोच. ती तुझ्याकडेच ठेव, पण तिचा उपयोग सामान्य जनतेच्या कल्याणासाठी कर. त्यांचे शाप घेऊन नुसती कोठाराची शोभा वाढवण्यात काय अर्थ? ही संपत्ती तुझ्याकडे असली तरी ती सामान्य जनतेची मालमत्ता आहे हे लक्षात ठेवून वाग. 'शुभं भवतु' एवढे बोलून तो साधू चालू लागला.





# बहुरूपी

''कोणत्याही वस्तूची आपली स्थिती न बदलण्याची नैसर्गिक प्रवृत्ती असते. या गुणधर्माला 'जडत्व' असे म्हणतात. म्हणजे असं बघा की, बंद पडलेल्या मोटारला धक्का मारताना सुरुवातीला जास्त जोर लागतो कारण मोटार जागेवरून हलायला विरोध करते. पण एकदा का ती चालू झाली की मात्र कमी जोर लावूनही तिला आपण ढकलू शकतो. पण आता तिला थांबवायचं असेल तर पुन्हा जास्त जोर उलट्या दिशेनं लावावा लागतो. कारण गतीत असताना ती पुन्हा आपली स्थिती म्हणजे गतिमान अवस्था बदलायला तयार नसते. यालाच आपण जडत्व –''

''ए तनुजा, तुझं लक्ष कुठाय? हे दहावीचं वर्ष आणि तू काय करतेयस? मी काय भिंतींशी बोलतेय?'' बाईंनी शिकवता शिकवता मध्येच थांबून तनुजाला झापलं.

तनुजा चाचरत म्हणाली, ''नाही बाई, लक्ष तुमच्याकडेच होतं. पण दारात गणू शिपाई आला आणि माझं लक्ष क्षणभर त्याच्याकडे गेलं. तेवढ्यात –''

''बरं, बरं बैस खाली.'' असं म्हणत त्या दारात उभ्या असलेल्या गणू शिपायाकडं वळल्या. गणूनं त्यांच्या हातात सूचना वही दिली. बाईंनी वही हातात घेतली आणि सूचना वाचू लागल्या.

''७ नोव्हेंबर हा दिवस भारताचे थोर शास्त्रज्ञ आणि नोबेल पारितोषिक विजेते सर सी. व्ही. रामन यांचा जन्मदिवस आहे. ह्या वर्षी आपली शाळा हा दिवस वेगळ्या पद्धतीनं साजरा करणार आहे. त्या निमित्तानं एक विज्ञान प्रदर्शन आयोजित करायचे आहे. ज्या विद्यार्थ्यांना या प्रदर्शनात भाग घ्यावयाचा आहे त्यांनी आपली नावे वर्गशिक्षकांकडे द्यावीत. प्रदर्शनाचे विषय आहेत – १) आधुनिक तंत्रज्ञान २) अंधश्रद्धा आणि समाज ३) शेतकऱ्यांसाठी विज्ञान.''

बाईंनी सूचना वाचून पूर्ण केली आणि खाली सही केली. वही घेऊन गणू शिपाई दुसऱ्या वर्गावर गेला. बाई पुन्हा आपल्या विषयाकडे वळल्या.

''तर मी काय सांगत होते... हं जडत्व. जडत्व म्हणजे पदार्थाची आपली नैसर्गिक स्थिती न बदलण्याची प्रवृत्ती. आता हेच पहा ना! तुमची नैसर्गिक प्रवृत्ती अभ्यास न करण्याची आहे. म्हणूनच शिक्षक आणि पालकांना तुम्ही अभ्यास करावा म्हणून जोर लावावा लागतो.''

बाईंच्या बोलण्यावर वर्गात हास्याची खसखस पिकली. तेवढ्यात तास संपल्याची घंटा झाली.

''आता उरलेला भाग पुढच्या तासाला पाहूया.'' असं म्हणून त्या वर्गाबाहेर जायला निघाल्या. दारातच तनुजाने बाईंना गाठलं आणि म्हणाली, ''बाई, मला विज्ञान प्रदर्शनात भाग घ्यायचाय. माझं नाव लिहून घ्या ना.'' त्याबरोबर आणखी दोनचार जणांनी आपली नावं घ्यायचा बाईंना आग्रह केला



''तनुजा, कोणती वस्तू बनवणार आहेस प्रदर्शनासाठी?'' बाईंनी विचारलं.

''अजून काही नक्की ठरवलं नाहीय. पण आधुनिक तंत्रज्ञानावर आधारित काहीतरी बनवायचंय हे मात्र निश्चित.''

पुढचे तास पी. टी. आणि कार्यानुभवाचे होते. त्या तासांना तनुजा प्रदर्शनासाठी काय तयार करायचं याचाच विचार करीत होती. शाळा सुटल्यावर मैत्रिणींबरोबर गप्पा न मारता ती तडक घरी आली. बूट काढून कपडे न बदलताच सरळ आपल्या पुस्तकांच्या कपाटाकडे वळली. प्रयोगासाठी लागणारी अनेक पुस्तकं तिच्याकडे होती. त्यातील एखादा प्रयोग करावा म्हणून ती पुस्तकं चाळू लागली.

''अग, हे काय! आल्याआल्याच हातपाय न धुता, कपडे न बदलता पुस्तकांचा पसारा काय मांडून बसलीयस?''

''अग आई, आज किनई आमच्या शाळेत सूचना आली होती – विज्ञान प्रदर्शनासंबंधी. मी भाग घेणाराय त्यात. म्हणून पुस्तकं धुंडाळतेय.''

''ते ठीक आहे ग! पण आधी जेवून बिवून तर घेशील की नाही? नंतर भरपूर वेळ आहे तुला आणि माझीही कामं लवकर आटोपतील. तेव्हा ताबडतोब जेवून घे बघू.''

अनिच्छेनंच तनुजा उठली आणि जेवायला बसली. जेवतानाही तिच्या डोक्यात प्रदर्शनात तयार करावयाच्या प्रयोगासंबंधीच विचार चालले होते.

''ए तनुजा, नुसती तंद्री काय लावून बसलीयस. जेवणात लक्षच नाहीय तुझं.'' आई.

भानावर येऊन तिने कसेबसे चार घास पोटात ढकलले आणि हात धुवून पुन्हा लगेच पुस्तकांमध्ये जाऊन बसली. त्यातील बरेचसे प्रयोग करून झालेले होते. यावेळेला काहीतरी नवीन करायला हवं असा विचार करत असतानाच तिला आठवलं की, मागच्याच आठवड्यात काकांनी यंत्रमानव आणि विमानं तयार करण्यासंबंधी दोनचार पुस्तकं आणून

दिली होती. ताबडतोब तिनं ती पुस्तकं बाहेर काढली आणि वाचायला लागली. यंत्रमानव बनवावा की विमान यावर तिची काही निश्चिती होईना. तिचं मन उलट सुलट विचार करू लागलं. एकदा वाटायचं, यंत्रमानव बनवावा तर एकदा वाटायचं, विमानच बनवावं. शेवटी हो ना करता करता तिनं यंत्रमानव बनवायचा निर्णय घेतला. त्यासाठी तिनं स्वतःच आपल्या मनाला कारणांची पुष्टी दिली. विमानं काय हल्ली कोणीही बनवतं. एवढी सोपी क्रिया आहे ती. पण अजूनपर्यंत मुलांनी यंत्रमानव बनवायचं धाडस कुठं केलंय? म्हणून आपणच ते करून लोकांपेक्षा काहीतरी वेगळं का करू नये? या विचारांनी तिच्या अंगात उत्साह संचारला.

तनुजानं मग त्या पुस्तकातून यंत्रमानवाचे सुटे भाग कुठल्या दुकानांतून मिळतील त्या दुकानांचे पत्ते टिपून घेतले. संध्याकाळी बाबा घरी आल्यावर तिनं बाबांना सारी हकीगत ऐकवली. बाबांनाही तिचं कौतुक वाटलं. त्यांनी तिला दुसऱ्या दिवशी त्या दुकानात घेऊन जाण्याचं कबूल केलं. त्यामुळं रात्री तिला शांत समाधानी झोप लागली. पण डोक्यात दिवसभर यंत्रमानवाचेच विचार घोळत असल्यानं तिला स्वप्नातही यंत्रमानव दिसू लागले.

तिनं तयार केलेला यंत्रमानव तिची सगळी कामं करत होता. तो तिला पाणी आणून द्यायचा. तिच्याशी बुद्धिबळ खेळायचा. तिला अभ्यासात मदत करायचा. तिच्या आईला घर पुसून द्यायचा. एवढंच काय पण तिला जर दुःख झालं तर तोही रडायचा. ती स्वप्नात एवढी दंग झाली होती की, सकाळी आईनं तिला उठवलं तेव्हाही तिला वाटलं की, आपला यंत्रमानवच आपल्याला उठवतोय म्हणून.

ती डोळे चोळत उठत म्हणाली सुद्धा, ''अरे, हे काय? अजून उजाडायचंय. मला झोपू दे. तुला झोप येत नाही म्हणून काय मलाही झोपू देणार नाहीस.'' पण समोर आईला बघून ती ओशाळली. आईला कळेना ही काय बडबडतेय ते.

''अग, कोणाला झोप येत नाहीय? मी तर चांगली झोपून आत्ताच उठले बघ. तुला शाळेत जायचंय ना? की आळसात अशीच लोळत पडणार आहेस?''



तनुजानं भरभर सगळं आवरलं आणि शाळेत जायला निघाली. जाताना बाबांना संध्याकाळी दुकानात जायचंय याची आठवण करून दिली. आज शाळेत तिचं लक्ष लागणं शक्यच नव्हतं. संध्याकाळपर्यंत तिनं कशी तरी कळ काढली. बाबा येईपर्यंत ती दुकानात जायला तयारच झाली होती. बाबा आल्याबरोबर ती म्हणाली ''चला.''

''अग हो, पण मला जरा चहा बिहा घेऊ देशील की नाही? नंतर लगेच निघू.''

बाबांचा चहा घेऊन झाल्यावर ते दोघे निघाले. जाताना ती पुस्तकं बरोबर घ्यायला विसरली नव्हती. दुकानात गेल्यावर ती एकेक अवयव निवडायला लागली. हात, पाय, तोंड, धड आणि हो! मेंदूही. हा मेंदू म्हणजे एक छोटा संगणक होता. त्यात वेगवेगळ्या फ्लॉपी घुसवल्या की झालं. आपल्याला हवं तसं यंत्रमानव काम करायला तयार! एका मोठ्या पुडक्यात बांधून ते सामान तिनं घरी आणलं.

नंतरचे आठ-दहा दिवस धावपळीतच गेले. पुस्तकाबरहुकूम ते वेगवेगळे अवयव जोडणे, जोडताना होणाऱ्या चुका दुरुस्त करणे, ते नीट बसले आहेत की नाही याची दक्षता घेणे इ. अनेक कामं तिच्यापुढे होती. एखाद्या मशीनचे सुटे भाग जोडून मशीन तयार करण्याचाच प्रकार होता हा. आधुनिक 'मेकॅनो'च म्हणाना. पण या यंत्रमानवात तिनं एक खुबी ठेवली होती. हा यंत्रमानव हातपाय तर हलवत असेच पण कमरेतूनही वाकत असे. एवढंच काय पण तो संवेदनाक्षमही होता. म्हणजे असं की, गुदगुल्या केल्यावर आपण पाय झटकन मागे घेतो ना, तसंच तोही करायचा. शेवटी एकदाचा तिचा यंत्रमानव तयार झाला. अगदी तिला हवा तस्सा. ती खूष झाली.

यंत्रमानवाकडं समाधानाने पाहत असतानाच तिच्या वर्गातला रूपेश तिच्याकडं आला. खरं तर रूपेश तिला काही फारसा आवडत नव्हता. कारण तो फारच दंगामस्ती करायचा. त्याच्या वर्गमित्रांना त्रास द्यायचा. त्यांच्या खोड्या काढायचा. एवढंच नव्हे तर त्याला एखादी गोष्ट, एखादी वस्तू आवडली तर ती पळवायचादेखील. त्यामुळंच तो आलेला तनुजाला आवडलं नाही.

''कशाला आलास ?'' त्रासिक नजरेनंच तनुजानं प्रश्न केला.

''अग काही नाही, तुझी भूगोलाची वही हवी होती जरा. काल मी शाळेत आलो नव्हतो ना ? तो अभ्यास अपूर्ण राहिला तर बाई मारतील. म्हणून धावतच आलो तुझ्याकडं.''

तनुजाला वाटलं की वही देऊच नये. चांगला बसू दे मार. ती काहीतरी उत्तर देणार एवढ्यात रूपेशचं लक्ष यंत्रमानवाकडं गेलं.

''व्वा! विज्ञान प्रदर्शनाची तयारी चाललीय वाटतं. यंत्रमानव तयार केलेला दिसतोय. बघू बघू.'' असं म्हणत त्यानं यंत्रमानव उचलला.

''ए, हात लावू नको त्याला. अजून पूर्ण व्हायचाय. त्याच्यात काही खुब्या टाकायच्यायत.'' पटकन् रूपेशच्या हातातून तो हिसकावून घेत तनुजा म्हणाली.





रूपेशला तो यंत्रमानव फारच आवडला होता. तो अख्खा तर पळवता येणं शक्यच नव्हतं. प्रदर्शनात याला नक्कीच बक्षीस मिळणार याची खात्री त्याला झाली. 'काय करावं बरं ?' असा विचार करत तो तनुजानं तयार केलेल्या यंत्रमानवाकडं टक लावून पाहत राहिला. त्याच्या आजूबाजूला काही सुटे भाग पडले होते. त्यातला एक भाग त्यानं तनुजाच्या नकळत खिशात टाकला आणि थोड्यावेळानं तिचं कौतुक करून तो वही न घेता निघून गेला. तनुजाला वाटलं, ''बरं झालं, वही न घेता गेला ते. नाहीतरी मला ती द्यायची नव्हतीच.''

तनुजा आपल्या यंत्रमानवाच्या कामात मग्न झाली. शेवटचा हात फिरवायला घेतला. प्रत्येक भाग नीट लागलाय की नाही ते तपासलं.

''अरे, हे काय ? त्याच्या नाडीची मोटर कुठे गेली ? आताच तर मी पाहिली होती.'' असं म्हणत ती शोधू लागली. पण तिला काही ती सापडली नाही. तिनं कपाटात धुंडाळलं पण व्यर्थ! कशी सापडणार ? रूपेशनं ती पळवली होती ना! तिलाही ही शंका आलीच. पण उचलताना पाहिलं नसल्यामुळं तो कबूल करेल हे अशक्यच होतं. दुसरी मोटर आणल्याशिवाय चालणारच नव्हतं.

या प्रसंगावरून तिनं एक बोध घेतला. तिनं यंत्रमानवाच्या मेंदूत एक कायमस्वरूपी प्रोग्रॅम भरून ठेवला. त्यात असं म्हटलं होतं की जो कोणी हा यंत्रमानव पळवेल त्याला हा यंत्रमानव बोचकारायला सुरुवात करील. एवढं की त्याच्या अंगाला खाजखुजली लागल्यासारखी खाज यायला सुरुवात होईल. मग तो वेड्यासारखा नाचायला लागेल.

''पण यंत्रमानवाला कसं कळेल की तो पळवला गेलाय म्हणून ?'' तनुजा स्वत:शीच विचार करू लागली. ''ठीक आहे. आपल्याच लक्षात येईल आधी. मग आपण असं करुया की एक दूरनियंत्रित कळ आपल्याकडं ठेवू. म्हणजे जेव्हा आपल्याला कळेल की, आपला यंत्रमानव पळवला गेलाय तेव्हा आपण ती कळ दाबायची. म्हणजे यंत्रमानवाच्या मेंदूतील प्रोग्रॅम काम करू लागेल आणि आपल्या करामती सुरू करेल.''

अशी सगळी व्यवस्था आणि जय्यत तयारी करून तिनं आपला यंत्रमानव प्रदर्शनासाठी सज्ज केला.

प्रदर्शनाचा दिवस उगवला. तनुजा आज नेहमीपेक्षा लवकर उठली. आईलाही उठवायची वेळ तिच्यावर आली होती आज. भराभर तिनं सगळं आवरलं आणि अंगात वारं शिरल्याप्रमाणे ती सुसाट शाळेकडं धावत सुटली. प्रदर्शनाच्या पहिल्याच दालनात पहिल्याच क्रमांकावर तिचा यंत्रमानव उभा होता. तिनं त्याच्याकडं अनिमिष नेत्रांनी पाहिलं. तिच्या डोळ्यांत त्याच्याविषयी प्रेम दाटून आलं होतं. तो आपला स्तब्ध उभा होता – मख्खपणं.

तिनं त्याला हाक मारली, ''विशाल, अरे मी आलेय. माझं स्वागत नाही का करणार ?'' असं म्हणत तिनं हस्तांदोलनासाठी हात पुढं केला. पण तो आपला मख्ख. तिला कळेना, काय झालंय याला ते. कालपर्यंत चांगला हस्तांदोलन करणारा आज असा काय वागतोय ? ती घाबरली. प्रदर्शनाचं उद्घाटन व्हायला दोन तासच उरले होते. आणि अचानक याच्यात काही बिघाड झाला तर मेलेच ! काय करावं ते तिला कळेना. त्याला खोलून पुन्हा तपासणी करावी तर तेवढा वेळही नव्हता. त्याच्या अंगावरचे कपडे, चेहरा आणि हातावर हुबेहूब त्वचेप्रमाणं दिसणारे आणि घट्ट बसणारे मुखवटे, एवढं सगळं काढून पुन्हा बसवणं म्हणजे जिकिरीचं वेळखाऊ काम होतं. ह्या सगळ्या पेहेरावामुळं तो खरं तर किती छान दिसत होता – अगदी एखाद्या मुलासारखा... गुटगुटीत !

''पण आता करायचं काय ?'' असं स्वत:शीच बडबडत ती मटकन् खाली बसली. तिला आता रडू येऊ लागलं होतं. तेवढ्यात तिच्या बाई आल्या. त्यांना पाहून ती रडायलाच लागली.

''अग, काय झालं काय ? एवढी हमसाहमशी का रडतेयस ?'' बाईंनी विचारलं.

''माझा यंत्रमानव... अं... अं...''

''काय झालं त्याला ? तो तर उभा दिसतोय आपल्या जागेवर.''



''तसं नाही हो ! तो माझ्याशी हस्तांदोलन करीत नाही की वाकून नमस्कारही. नुसता ठोकळ्यासारखा उभा आहे. जराही हालचाल करीत नाहीय. मला रडताना पाहून रडणारा हा आज मात्र दगड झालाय. आत्ता प्रदर्शनाचं उद्घाटन होईल. तेव्हा मी काय करू ?'' एका दमात तनुजानं सांगितलं.

बाई तिच्या वेंधळेपणावर गालातल्या गालात हसत होत्या. अशावेळी बाईंनी हसावं याचा तनुजाला राग आला. पण ती तरी काय करू शकणार होती ?

''अग वेडाबाई, काल याला इथं ठेवल्यानंतर त्याच्या मेंदूत ठेवायच्या सगळ्या फ्लॉपीज हरवू नयेत म्हणून तू मला माझ्या लॉकरमध्ये ठेवायला नाही का दिल्यास ? विसरलीस ? मग कसा काय तो तुझ्याशी हस्तांदोलन करेल ?''

''अरे होऽकी,'' तनुजाची कळी एकदम खुलली. तिचं रडं कुठल्याकुठे पळालं. मग तिनं बाईंच्या लॉकरमधून फ्लॉपीज आणल्या आणि त्यातील तिला हवी ती त्याच्या मेंदूत घुसवली. त्याबरोबर विशाल बोलू लागला.

''आपले स्वागत असो. आपण आलात, आनंद वाटला. तुमच्याबरोबर चार क्षण घालवायला मिळावेत असं बरेच दिवसांपासून वाटत होतं.'' असं म्हणून त्यानं हस्तांदोलनासाठी हात पुढे केला. तनुजानंही खुषीत येऊन त्याच्या हातात हात दिला.

''प्रमुख पाहुणे मंत्रीमहोदय यायची वेळ झाली. चला, सगळ्यांनी आपापल्या जागेवर जा.'' बाईंनी सूचना केली. आणि प्रदर्शनात भाग घेतलेल्या विद्यार्थ्यांनी आपापल्या प्रयोगाजवळ जाऊन निवेदनाची तयारी केली. स्टेशनात गाडी शिरताना ज्याप्रमाणं प्रवासी गाडीत चढण्यासाठी तयार होतात तसंच काहीसं हे दृश्य दिसत होतं.

'पाहुणे आले. पाहुणे आले.' अशी कुजबुज दालनाबाहेर झाली. आणि सगळीकडं शांतता पसरली. हेडमास्तर पाहुण्यांना घेऊन आले. दालनाभोवती गर्दी जमली. दालनातील विद्यार्थी आपापल्या जागेवरून

प्रवेशद्वाराकडं पाहत होते. अगदी उत्सुकतेनं. कधी पाहुणे आत येताहेत आणि आपण त्यांना आपल्या प्रयोगाची माहिती देतोय असं त्यांना झालं होतं.

पाहुण्यांनी रीतसर फीत कापली आणि उद्घाटन झाल्याचं जाहीर केलं. नंतर ते हेडमास्तरांबरोबर आणि शिक्षकांच्या लवाजम्यासह दालनात प्रवेश करते झाले. आत प्रवेश केल्याबरोबर –

''आपले स्वागत असो. आपण आलात, आनंद वाटला. तुमच्याबरोबर चार क्षण घालवायला मिळावेत असं बरेच दिवसांपासून वाटत होतं. तुम्हाला हे विज्ञान प्रदर्शन पाहून आनंदच वाटेल अशी खात्री वाटते.'' असं म्हणून तनुजाच्या यंत्रमानवानं हस्तांदोलनासाठी हात पुढे केला.

पाहुण्यांनी कौतुकभरल्या नजरेनं त्याच्याकडं पाहिलं आणि आपला हातही पुढे केला. हस्तांदोलन झाल्यावर त्यांनी त्याचा एक छानसा गालगुच्चा घेतला. त्यांना ते गुटगुटीत पोरगं फार आवडलं. नंतर या यंत्रमानवानं पाहुण्यांना काही कसरतीचे खेळ करून दाखवले. शीर्षासन, हवेत उड्या मारणे, डोंबाऱ्यासारखे उलटे चालणे आणि बरेच काही. ते पाहून मंत्रीमहोदय आणखीनच खूष झाले. त्यांना वाटलं, हा यंत्रमानव आपल्या मुलांसाठी चांगलं खेळणं होईल. मग ते दालनातील इतर प्रयोगांकडं वळले. मुलांचा उत्साह नुसता ओसंडून चालला होता. हळूहळू संपूर्ण दालनातून पाहुण्यांनी फेरी मारली. त्यांच्या चेहऱ्यांवरून जाणवत होतं की, त्यांना प्रदर्शन आवडलंय. ते दुसऱ्या दालनाकडं जायला वळले. तो –

''आम्ही आपले आभारी आहोत. आपल्याला प्रदर्शन निश्चितच आवडले असेल. पुन्हा भेट द्या.'' अशी वाक्ये त्यांच्या कानांवर आली. त्यांनी त्या दिशेनं पाहिलं. त्यांना दिसलं की, ते गुटगुटीत पोरगं त्यांना कमरेतून वाकून 'एअर इंडिया'च्या महाराजाप्रमाणं नमस्कार करतंय. त्यांनी त्याच्या पाठीवर हलकेच थोपटून ते बाहेर पडले.

दुसऱ्या, तिसऱ्या, चौथ्या दालनातून त्यांनी फेरी मारली. प्रत्येक विद्यार्थ्यानं कष्ट घेतलेले दिसत होते. उत्तमोत्तम प्रयोग मांडलेले होते.



त्यावरील निवेदनही विद्यार्थी सफाईदारपणं करीत होते. हे सर्व पाहत असतानाही ते गुटगुटीत पोरगं मात्र त्यांच्या नजरेपुढून हलत नव्हतं. शेवटच्या दालनातून बाहेर पडता पडता त्यांनी न राहवून हेडमास्तरांना विचारलंच –

''पहिल्या दालनातील तो चुणचुणीत गोड मुलगा कुणाचा आहे हो?''

हेडमास्तर आणि आजुबाजूचे शिक्षक गालातल्या गालात हसले. पण एक मुलगा मात्र जोरानं हसला. त्याला बिचाऱ्याला काय माहीत मोठ्यांचे शिष्टाचार! तो आपला बालसुलभ स्वभावानुसार 'कशी फजिती झाली पाहुण्यांची!' या विचारानेच हसला. आणि आपल्या मित्रांना ही गंमत सांगायला पळाला. क्षणभर पाहुणे चक्रावले. हेडमास्तरांनी त्यांना जास्त संभ्रमात न ठेवता ''यंत्रमानव आहे तो.'' असे घाईघाईने सांगून टाकले.

''एवढ्या हालचाली मुक्तपणे यंत्रमानव करू शकतो काय?''

''हवं तर पुन्हा एकदा खात्री करून घ्या.'' हेडमास्तरांनी विनंती केली.

मंत्रीमहोदय तडक पहिल्या दालनाकडं निघाले. दारात पोहोचताच त्यांनी त्या गुटगुटीत पोराला प्रश्न केला; ''नाव काय बाळ तुझं?''

''विशाल.''

''कुठं राहतोस?''

''एल-१४, सेक्टर-७, वाशी, नवी मुंबई.''

''बाबांचं नाव काय?''

''विजय आर्यभट''

''काय करतात ते?''

''नोकरी.''

पाहुण्यांनी एकप्रकारे त्या मुलाची मुलाखतच घेतली. सगळ्या प्रश्नांची उत्तरं तो न डगमगता धडाधड स्पष्ट शब्दांत देत होता.

''यंत्रमानव त्याला पढवलेलं बोलू शकतो हे तर तुम्हाला माहीत आहे ना साहेब?'' हेडमास्तरांनी नम्रतेनं सुचवलं.

मंत्रीच ते. पेटले इरेला. आपला पराभव म्हणजे काय! त्यांनी शेजारील टेबलावरील पिन हातात घेतली आणि क्षणात त्याच्या दंडात टोचली.

''ओयू, ओयू, अयाईऽऽग'' असं विशाल ओरडायला लागला.

मंत्री आपल्या प्रसंगावधानतेवर खूष होत म्हणाले, ''यंत्रमानव कधी असं माणसासारखं वागतो का?''

''अहो, या यंत्रमानवात संवेदनाक्षमता आहे.''

''माणसाला जसं हृदय असतं तसं यंत्रमानवाला नसतं. पाहूया त्याची नाडी लागते का?'' असं म्हणत पाहुण्यांनी विशालचा हात हातात घेतला आणि नाडी तपासू लागले. आणि काय आश्चर्य? त्यांच्या हाताला नाडीचे ठोके जाणवू लागले की! त्यांनी हेडमास्तरांनाही नाडी तपासायला सांगितली. हेडमास्तरांनी त्यांच्या समाधानासाठी नाडी तपासायला सुरुवात केली. आता चकित व्हायची पाळी हेडमास्तरांची होती. विशालची नाडी चक्क थडथड उडत होती. हेडमास्तरांनी तनुजाकडं पाहिलं तर ती गालातल्या गालात हसत होती.

मंत्रीमहोदयांनी त्या दालनातून आणखी एकदा फेरी मारली. शिक्षक भाषणाच्या कार्यक्रमाची तयारी करण्यासाठी निघून गेले. हेडमास्तरांनाही तेवढ्यातच फोन आला म्हणून जावं लागलं. मंत्रीमहोदय एकटेच दालनात राहिले. त्यांचं लक्ष पुन: पुन्हा यंत्रमानवाकडं जात होतं. तनुजाही काही कामानिमित्त बाहेर गेली.

थोड्या वेळानं हेडमास्तर परत आले. त्यांनी मंत्रीमहोदयांना रंगमंचावर येण्याची विनंती केली. मंत्रीमहोदय हेडमास्तरांबरोबर रंगमंचावर मांडलेल्या खुर्च्यांवर स्थानापन्न झाले. हेडमास्तरांनी स्वागतपर भाषण केले आणि प्रमुख पाहुण्यांना भाषण करायची विनंती केली. तत्पूर्वी तनुजाचा सत्कार करायचं ठरलं होतं. कारण प्रदर्शनात तिला पहिल्या क्रमांकाचं बक्षीस मिळालं होतं. तनुजाला बोलवायला बाई गेल्या, पण तनुजा काही दालनात नव्हती आणि तिचा यंत्रमानवही. बाईंना वाटलं की, यंत्रमानव घेऊन ती रंगमंचाकडे गेली असेल.



''मी येण्याआधीच कुणीतरी तिला निरोप पोहचवलेला दिसतोय.'' स्वत:शीच पुटपुटत त्या मागे वळल्या. पण रंगमंचाजवळही ती दिसत नव्हती. सगळीकडं शोधाशोध सुरू झाली. थोड्या वेळानंतर कुणीतरी सांगितलं की, ती काही महत्त्वाचा निरोप घरून आला म्हणून घरी गेलीय. पाच मिनिटांत जाऊन येते म्हणून सांगून गेलीय.

''पण मग यंत्रमानव न्यायची काय गरज होती?'' कुणीतरी बडबडलं. ''बक्षीस मिळालं म्हणून काही एवढं शेफारून जायला नकोय. अजून प्रदर्शन चालू आहे. कसं काय ती त्याला उचलून नेऊ शकते?'' कुणीतरी असंतुष्ट आत्मा बडबडतच होता.

तेवढ्यात तनुजा आली. तिला ताबडतोब रंगमंचावर नेण्यात आलं. रंगमंचावर पाच-सात मिनिटं मंडळी खोळंबून होती. हेडमास्तरही अस्वस्थ झाले होते. सूत्रसंचालन करणाऱ्या बाईंनी प्रसंगावधान राखून त्या वेळात शाळेच्या प्रगतीचा अहवाल वाचून दाखवला. खरं तर तो आजच्या कार्यक्रमातील भाग नव्हता. पण वेळ घालवण्यासाठी काहीतरी करणं आवश्यक होतं. पाहुण्यांना मागे काय गडबड झालीय याचा त्यामुळं पत्ताच लागला नाही.

तनुजाचं बाईंनी तिला पाहिल्यावर नाव पुकारलं आणि मंत्रीमहोदयांच्या हस्ते तिचा सत्कार केला गेला.

सत्कार समारंभात उत्तर देताना तनुजा म्हणाली, ''यंत्रमानव हा खऱ्या माणसापेक्षा खूप चांगला आहे. न कुरकुरता तासन् तास तो आपण सांगू ते काम करू शकतो. तो आजारी पडत नाही, चहा कॉफी प्यायची हुक्की त्याला येत नाही की, मानापमान, हेवेदावे यांच्या आहारीही तो जात नाही.''

यावेळी हेडमास्तरांनी तनुजाकडं डोळ्यांच्या कडांतून हळूच पाहिलं. तनुजा आपल्याच नादात बोलत होती –

''यंत्रमानव हा कधीही माणसाला इजा करत नाही. करू शकणार नाही. कारण आयझॅक असिमॉव या थोर विज्ञान लेखकाने प्रत्येक

यंत्रमानव तयार करताना ज्या तीन अटींचा उपाय सुचवला होता तोच आज जगभर वापरला जातोय. त्या अटी अशा – १) कोणत्याही मानवाला यंत्रमानवाने कोणत्याही परिस्थितीत आणि कारणाने इजा करू नये वा होऊ देऊ नये. २) वरील नियम न मोडता त्याने, माणसाने दिलेल्या आज्ञा पाळल्याच पाहिजेत. आणि ३) वरील दोन्ही नियम किंवा त्यांपैकी कोणताही एक नियम मोडत नाही तोवर त्याने स्वत:चे संरक्षण करायला हवे. यामुळे हुबेहूब माणसासारखा यंत्रमानव तयार झाला तरी तो माणसाच्या वरचढ होणार नाही. झालंच तर मोठ्या प्रमाणात आपल्याला त्याची मदतच होऊ शकेल. तेव्हा त्याच्याकडे आपण एक खेळणं म्हणून न पाहता एक उपयुक्त साथीदार म्हणूनच पहायला हवं.''

तनुजाच्या भाषणानंतर प्रमुख पाहुणे बोलायला उठले. त्यांनी तनुजाच्या बुद्धीचं कौतुक केलं आणि म्हणाले, ''सकाळी घडलेल्या प्रसंगावरून मला माझ्या लहानपणी शाळेतील पुस्तकात वाचलेली गोष्ट आठवते. त्या धड्याचं नाव होतं 'बहुरुप्याचा खेळ'. त्या खेळातील बहुरुपी बनलेल्या माणसानं बैलाचं सोंग इतकं हुबेहूब वठवलं होतं की, गर्दीतील एका लहान मुलानं तो खरा बैल आहे की नाही हे पाहण्यासाठी त्याच्या अंगावर एक दगड भिरकावला. दगड लागल्याबरोबर त्या बहुरुप्यानं बैलाच्या सवयीप्रमाणं कातडी थरथरवली. आज तनुजाच्या आधुनिक बहुरुप्यानंही जिवंत माणसाचं लक्षण असलेली नाडी दाखवून आम्हा सगळ्यांना चक्रावून सोडलं. तिच्याकडे पाहून असं वाटतं की, भारताचं भविष्य उज्वल आहे. पण तिनं नाडी कशी चालू केली याचं कोडं उलगडून दाखवावं अशी माझी तिला विनंती आहे.''

मुख्य पाहुण्यांचं भाषण चालू असतानाच तनुजानं एक चक्कर आपल्या दालनात मारली होती आणि तिच्या लक्षात आलं की, आपला विशाल – यंत्रमानव तिथं नाहीय. ती घाबरीघुबरी होत रडण्याच्या बेतात आली. तिनं दालनातील मित्रमैत्रिणींना विचारलं; कुणी गंमत म्हणून लपवला आहे काय म्हणून. काही म्हणाले नाही, तर काही म्हणाले, आम्हाला वाटलं तूच उचलून नेलायस म्हणून. तिला काय करावं ते सुचेना. ती तशीच धावत बाईंकडे गेली आणि बाईंना यंत्रमानव हरवल्याचं सांगितलं.



''मलाही मघाशी मी तुला शोधायला आले तेव्हा तिथं दिसला नाही. तेव्हा मला वाटलं तू घेऊन गेली असशील तुझ्याबरोबर. म्हणून मी काही फारसा विचार केला नाही. चल, आपण शोधूया.'' असं म्हणत बाई तिच्यासह प्रदर्शनाकडं चालायला लागल्या. जाता जाता तनुजाच्या मनात विचार आला की, हे काम त्या रूपेशचं तर नसेल? ह्या गर्दीत तो असेलच. पण कबूल कसा करेल? त्यानं कुठंतरी लपवून ठेवला असला तर कळणारही नाही.

'काय करावं बरं?' असा विचार करत असतानाच तिनं आपल्याजवळचा शेवटचा उपाय वापरायला सुरुवात केली.

''बाई, नकोच जाऊया त्या दालनांमध्ये. इथंच उभे राहू. सापडेल तो आपोआप.''

''आपोआप सापडायला काय तो तुझ्याकडं चालत येणार आहे?''

''पहा तर खरं गंमत आता!'' असं म्हणत ती पाहुण्यांचं भाषण ऐकायला लागली. एव्हाना तिनं तिच्याजवळची दूरनियंत्रित कळ दाबली होती. पाच मिनिटांतच कोणीतरी तिचा यंत्रमानव पळवला होता आणि तो एवढ्याशा वेळात बाहेर जाणंही शक्य नव्हतं. म्हणजे जे काही घडेल ते या आवारातच. दरम्यान बाईंनी रंगमंचावर यंत्रमानव हरवल्याची सूचना देण्यासाठी म्हणून हेडमास्तरांकडे चिठ्ठीही पाठवली होती. हेडमास्तर चिठ्ठी वाचून अस्वस्थ झाले. पाहुण्यांचं भाषण चालूच होतं. त्यांना कसं थांबवावं या संधीची ते वाट पहात होते.

''– तर बंधूंनो, आपल्या देशात...'' असं म्हणतानाच त्यांच्या कंबरेला खाज यायला लागली. त्यांनी खाजवायला सुरुवात केली आणि म्हणाले, ''...तुमच्यासारखी गुणी मुलं आहेत...'' आता ती खाज एवढी वाढली होती की ते जागच्या जागेवर उड्या मारू लागले. त्यांना कळेना की अचानक खाज कशी काय सुरू झाली. ''...म्हणूनच देशाचं भविष्य उज्वल आहे. मी...'' त्यांनी दोन-चार चापट्या पायावर मारल्या आणि पाय खाजवायला लागले, त्यांच्या बगलेतूनही खाज यायला लागली. रुमाल काढण्यासाठी म्हणून त्यांनी झब्ब्याच्या खिशात हात घातला तेव्हा त्यांच्या लक्षात आलं की, मघाशी त्यांनी पळवलेला यंत्रमानव



खिशातून त्यांना बोचकारे काढतोय. त्यांनी त्याला खिशातच मुठीत पकडला. तर यंत्रमानव त्यांच्या हातालाच जोरजोरानं बोचकारे काढू लागला.

''ओऽय, ओऽऽय.'' मंत्रीमहोदय अचानक ओरडले. हेडमास्तरांनाही कळेना प्रमुख पाहुणे असं काय करताहेत ते. ते धावतच त्यांच्याजवळ गेले. पाहुण्यांच्या चेहऱ्यावर उमटणाऱ्या वेदना त्यांना स्पष्ट दिसत होत्या. त्यांनी ताबडतोब पाणी मागवलं. दोन-चार शिक्षक पाणी



आणायला पळाले. मंत्रीमहोदय इकडे खिशातल्या खिशात यंत्रमानवाला गच्च पकडून ठेवायचा प्रयत्न करीत होते. सगळे प्रेक्षकही क्षणभर चक्रावले.

हेडमास्तरांनी त्यांना पकडून खुर्चीवर बसवलं. त्यांना वाटत होतं की पाहुण्यांना हार्ट ॲटॅक तर आला नाही ना ? त्यांनी एका शिक्षकाला ताबडतोब डॉक्टरांना बोलवायला पिटाळले. खुर्चीवर बसल्यावर मंत्रीमहोदयांना पाणी प्यायला दिलं. पाण्याचा ग्लास हातात घेण्यासाठी त्यांनी खिशातून हात बाहेर काढला. कसंबसं घोटभर पाणी प्याले. आणि लगेचच ''ओय, ओय'' करत खुर्चीवरून उठले. त्या गडबडीत त्यांना जोराचा ठसका लागला. त्यामुळं ते आणखी कासावीस झाले. त्यांना काय करावं ते कळेना.

ताबडतोब त्यांनी आपला हात पुन्हा खिशात घातला. कारण आतून यंत्रमानव बोचकारे काढतच होता. खिशात हात घातल्याबरोबर यंत्रमानवानं त्या हातावरच असा जोराचा बोचकारा काढला की, मंत्रीमहोदय 'आयाईऽऽऽग' म्हणून जोरात ओरडले. आपली फजिती झालेली पाहून त्यांना एका बाजूला लाज वाटत होती तर दुसऱ्या बाजूनं या यंत्रमानवाला गप्प कसं करावं तेच कळत नव्हतं. कारण घट्ट मुठीत पकडला तर हाताला बोचकारे बसत आणि खिशातून हात काढला तर कमरेवर, बगलेखाली बोचकारे बसत. त्यांचं संपूर्ण अंग घामाने डबडबलं होतं. झब्बा तर पार भिजून गेला होता. शेवटी बोचकारे सहन न होऊन त्यांनी खिशातला यंत्रमानव बाहेर काढून टेबलावर ठेवला आणि मान खाली घातली.

''अरे, हा तर तनुजाचा यंत्रमानव !'' हेडमास्तर आश्चर्यचकित होत म्हणाले.



# करायला गेलो एक

साल २००१. भारतातलं एक आधुनिक खेडं. आता त्याला खेडं म्हणावं का ? हाही एक प्रश्नच आहे. कारण या खेड्यात ग्रामपंचायतीच्या इमारतीला फिरते जिने आहेत. खेड्यातील वाहहानं एक तर सौरशक्तीवर चालतात, वा इलेक्ट्रॉनिक घटांवर. म्हटलं तर या खेड्यातील काही उच्चभ्रूंच्या हॉटेलात यंत्रमानवही वेटर म्हणून काम करतात. काही इमारतीला फिरते जिने आहेत. खेड्यातील वाहनं एक तर सौरशक्तीवर करणारे आहेत. असं बरंच काही.

आता तुम्ही म्हणाल या भाणसाला हे गाव खेडं म्हणायला नक्कीच वेड लागलं असलं पाहिजे. पण सबूर, थोडं सबूर. काय आहे की, साल २००१ चं हे खेडं असल्यामुळे, त्याचा तोंडवळा जरी शहरासारखा वाटत असला तरी ते खेडंच. कारण शहरं ही त्यापेक्षा प्रचंड वैज्ञानिक सुविधा उपभोगत आहेत. या शहरांमध्ये काय नाही ? व्हिजी फोनपासून ते प्रवासी अवकाशउड्डाणफेऱ्यापर्यंत सर्व काही आहे. जेवताना फक्त तोंड हलवायचा त्रास व पचवायचा त्रास काय तो ! बाकी जेवण करण्यासाठी काहीच कष्ट करावे लागत नाहीत. यंत्राच्या एका बाजूस जेवणाचा मालमसाला भरायचा की पलीकडून संपूर्ण जेवण तयार होऊन बाहेर पडतं. आता ह्या सगळ्या सोयी काही या खेड्यात – रामपूर त्याचं नाव – नव्हत्या. म्हणून मी आपलं म्हटलं हे खेडंच.

तर सांगायचा मुद्दा असा की, या खेड्यात 'अन्नपूर्णा सुग्रास गृह' नावाचं एक पंचतारांकित हॉटेल आहे.



या हॉटेलात वेटर म्हणून चार यंत्रमानव काम करतात. त्यांची नावं क्र. १ ते ४ अशीच ठेवली आहेत. नाही तरी हे एक प्रकारचं यंत्रच. यांना काय नावाचं कौतुक असणार ? सोयीचं म्हणून क्रमांकच बरे असं वाटून या हॉटेलच्या मालकानं त्यांना नोकरीवर ठेवलं. आता तुम्ही म्हणाल, यंत्रमानवाला नोकरीवर ठेवलं ही काय भानगड आहे ? त्याला तर सरळ विकत घ्यायचं अन् गुलाम म्हणून राबवायला सुरुवात करायची. जसे आपण इतर यंत्रांबरोबर वागतो.



पण जरा लक्षात घ्या. इतर यंत्रे व यंत्रमानव यात फरक आहे. काही म्हटलं तरी ही शेवटी मानवाची प्रतिकृतीच. त्याला भावना नसल्या म्हणून काय झाले, तो सॉरी, गुड मॉर्निंग, थँक्यू इ. शब्द बोलू शकतो. महत्त्वाचं म्हणजे यंत्रमानवाची किंमत अफाट आहे. मग हे यंत्रमानव तयार करणाऱ्या कंपनीकडून भाड्याने घेता येतात आणि त्याचे भाडे दरमहा या कंपनीच्या मालकाला द्यायचे. म्हणजे एका अर्थाने हा त्या यंत्रमानवाचा पगारच.

बघा, बोलण्याच्या ओघात सांगायचा मुद्दा बाजूलाच राहतो आणि इतरच चालू होते. तर आपला मुद्दा असा की हे चारही यंत्रमानव कामात अगदी हुषार... तत्पर, चपळ आणि इतर बरेच काही. मालकाच्या डोक्याला कसलाही ताप नाही. ओव्हरटाईमची कटकट नाही, की काम जादा करून घेतल्याबद्दलची तक्रारही नाही. मालक कसा खूष होतो त्यांच्यावर. पण गाडे सतत सुरळीत चालेल ते जीवन कसले ?

एके दिवशी क्र. ४ नं हॉटेलात धमाल केली. तो धड काम करीनासा झाला. आता तुम्ही म्हणाल त्यात काय ? यंत्रच शेवटी ते, कधी तरी ते बिघडणारच.

अहो, पण माझे थोडे ऐकून घ्या की. मलाही कळतंय यंत्र कधी तरी बिघडणार ते. पण क्र. ४ चं बिघडणं हे नेहमीपैकी नव्हतं राव. तो अगदी बाहेरची बाधा झाल्यासारखा वागायला लागलालं की अचानक. नाही कळलं ? मग आता पहिल्यापासून सगळं बैजवार सांगतो बघा.

पण त्याचं काय आहे की, हा आपला क्र. ४ आहे नं, हा अगदीच चांगला माणूस बघा. अगदी सांगकाम्या म्हणा ना. हॉटेल सुरू झालं की व्यवस्थित गिऱ्हाइकांची खातिरदारी करण्यात ह्याच्या हातून जराही कुचराई व्हायची नाही. सारं कसं झ्याकपैकी चाललं होतं त्याचं.'

पण त्या दिवशी मात्र काय झालं कळेना. दुपारी १२ वाजेपर्यंत गडी व्यवस्थित होता. पण लंच टाईम सुरू झाला अन् बडी बडी धेंडं जेवायला यायला लागली. तसतसं हळूहळू याचं बिनसू लागलं. तो ज्या टेबलावर काम करीत होता, त्या टेबलावर त्याची नेहमीची गिऱ्हाइकं



यायला लागली. त्यानं ऑर्डर नोंदवली. म्हणजे काय की, त्याच्या छातीवरच्या पुस्तकावर त्या गिऱ्हाइकानं दोन-चार बटनं दाबली व ती ऑर्डर नोंदली गेली. नंतर तो किचनरूममध्ये गेला अन् ती ऑर्डर स्वयंपाक्याला दाखवली. अन् पुन्हा दुसऱ्याची ऑर्डर घ्यायला हजर झाला. अशा दोन-चार ऑर्डरी नोंदवून त्याने पदार्थ आणले. आणि गिऱ्हाइकासमोर ठेवू लागला. पदार्थ मांडताना शाकाहारी पदार्थ मांसाहारी गिऱ्हाइकाला तर मांसाहारी पदार्थ पूर्ण शाकाहारी गिऱ्हाइकाला असे मांडले गेले. त्यांना वाटलं झाली असेल चूकभूल. होतं असं कधी कधी. पण त्याने त्याच्या इतर टेबलांवरही हाच गोंधळ केला. पैकी एक तापट शाकाहारी मालकाजवळ गेला अन् वैतागून म्हणाला, 'तुम्ही वेटर्सना नीट शिक्षण दिलेलं दिसत नाहीयू. आज माझा श्रावणी सोमवार.



मी उपासाचं मागितलं तर त्याने चक्क मटन आणून माझ्यापुढं ठेवलं. माझी खाण्यावरील इच्छाच उडाली की त्यामुळं.'

मालकानं शांतपणे त्याचं म्हणणं ऐकून घेतलं. अन् त्याला त्याच्या जागेवर बसवून तो स्वत: आत गेला व त्याची ऑर्डर घेऊन आला.

थोड्या वेळानं आतून हॉटेलचा सीनियर स्वैंपाकी केकाटत बाहेर आला व मालकाकडं तक्रार करू लागला, 'साहेब, क्र. ४ नं माझ्या अंगावर कुकिंग रेंजवर शिजत असलेलं मटणाचं पातेलं उलटवलं. पण माझ्या सावधानतेमुळं मी थोडक्यात बचावलो. नाहीतर माझा आज घात झाला असता. तो जर आता आतमध्ये येणार असेल तर मी मुळीच काम करणार नाही.'

मालक चिंतेत पडला. मघाशी त्यानं टेबलावरच्या पदार्थांत गोंधळ घातला अन् आता स्वयंपाकघरात. काय झालंय काय ह्याला ? हॉटेलात तर ही गर्दी वाढायला लागलीय. ह्या वेळेला हा स्वयंपाकी घरी गेला तर आपली कंबख्तीच. त्यानं दादापुता करून त्या स्वयंपाक्याला समजावलं अन् परत स्वयंपाकघरात पाठवलं. गल्ल्यावर बसल्या बसल्या क्र. ४ चं तो निरीक्षण करू लागला. ह्याच्या कंपनीच्या मेकॅनिकला बोलवावं काय ? पण ही गर्दीची वेळ असल्यामुळे त्यानं हा विचार तात्पुरता रद्द केला. संध्याकाळनंतर बघू वा उद्या सकाळीच बघू असा विचार करून गल्ल्यातील पैसे खुळखुळवू लागला.

ह्या वेळेपर्यंत लंच टाईमला बहर आला होता. हॉटेल अगदी हाऊसफुल्ल झालं होतं.

तेवढ्यात क्र. ४ च्या चाळ्यांना सुरुवात झाली. त्याचं आणि त्याच्या टेबलावरच्या गिऱ्हाइकाचं काय बिनसलं कोण जाणे! पण क्र. ४ नं त्या टेबलावरील सूपचा बाऊल उचलला नि सरळ त्या गिऱ्हाइकाच्या डोक्यावर पालथा केला. त्याबरोबर ते गिऱ्हाईक केकाटत उठलं अन् फाडकन् क्र. ४ च्या मुस्काटीत मारली. पुन्हा ओय, ओय करीत हाताला आलेल्या झिणझिण्या झटकायला लागलं. क्र. ४ ला ढिम्म काहीच झालं नाही. कारण त्याचं शरीर धातूचं होतं.



हे गिऱ्हाईक झिणझिण्या आलेला हात झटकत असतानाच, तो हात शेजारी बसलेल्या गिऱ्हाइकाच्या सांबाराच्या वाटीत बुडाला अन् पुन्हा तो केकाटला. ती वाटी त्या गिऱ्हाइकाच्या मांडीवर उपडी झाली. तसं ते गिऱ्हाईक पहिल्याशी भांडू लागलं.

हे होत असतानाच आपल्या क्र. ४ नं आणखी एक कृती केली. त्या टेबलावरील एक आइस्क्रीमचा कप घेतला अन् पहिल्या गिऱ्हाइकावर फेकला. पण फेकताना नेम चुकल्यामुळे तो पलिकडील गिऱ्हाइकाच्या चेहऱ्यावर जाऊन बसला. झालं, त्या गिऱ्हाइकानं रागानं तो खात असलेली दहीवड्याची प्लेट उचलली आणि क्र. ४ वर भिरकावली. पण ती क्र. ४ च्या बाजूला उभ्या असलेल्या तिसऱ्याच माणसावर आदळली. मग हॉटेलच्या त्या भागात एकच रणकंदन सुरू झालं. समोर दिसेल त्या प्लेटी हातात घेऊन माणसं एकमेकांच्या अंगावर गोळ्या सुटाव्यात अशा वेगानं फेकू लागली.

पुन्हा क्र. ४ नं एक टेबलच उलथून टाकलं. त्याच्या खाली एक-दोन माणसं सापडली व केकाटायला लागली. हा गोंधळ पाहून काहीच न उमजल्यामुळे हॉटेलातील बायकामुलं बाहेर पडण्यासाठी सैरावैरा धावू लागली. त्या धक्काबुक्कीने गोंधळ आणखीनच वाढला.

ह्या सगळ्या घटना एवढ्या चटकन् घडल्या की क्षणभर हॉटेलच्या मालकालाही कळेना, काय घडतंय ते. तेवढ्यात त्याला क्र. ४ नं टेबल उलथून लावलेलं दिसलं. अन् तो त्याला धरण्यासाठी विजेच्या लोळासारखा काऊंटरवरून धावला. त्याच्या धावपळीमुळे त्याला आडवे आलेले कोलमडले, अन् उठून त्याला मारायला धावले.

एवढ्या काळात हॉटेलच्या बाहेर बघ्यांची ही गर्दी उसळली होती. कुणी म्हणत होतं, हॉटेलला आग लागली, तर कुणी म्हणत होतं, हॉटेलमध्ये गावात आलेल्या सर्कशीतील माकड घुसलंय.

काही अती उत्साही तरुणांनी बंबवाल्यांना, हॉस्पिटलातील रुग्णवाहिकांना अन् पोलिसांना फोनाफोनी केली. पुढच्या पाचच मिनिटांत ही सर्व मंडळी हजर झाली.

पोलिसांनी तर उतरल्या उतरल्याच आपल्या दांडक्याचा प्रसाद बघ्यांना द्यायला सुरुवात केली. 'बाजू हटो' म्हणून ओरडत ते हॉटेलच्या दारापाशी आले. त्याबरोबर त्यांच्या अंगावर मटनाचा रस्सा असा काही पडला की, त्यांना समोरचं काहीच दिसेना. त्यामुळे ते कावून डोळे मिटून काठ्या हाणू लागले. परिणामी खिडक्यांची तावदानं, फ्लॉवर पॉट, ग्लासेस वगैरे फुटून जमिनीवर त्यांचा खच पडला. मालक हे सगळं नुकसान एका कोपऱ्यात बसून हताशपणे पाहात होता.

एवढ्यात पोलीस इन्स्पेक्टर भोसले आले अन् त्यांनी आधी जमाव काबूत आणला. मग ते एकेकांना घालवीत हॉटेल मालकाला शोधायला लागले. स्वयंपाकघराकडे ते जाऊ लागले तो त्यांना दिसलं की, ते दार बंद करून आत सगळे कर्मचारी लपून बसले आहेत, दरवाजाबाहेर मालक कपाळावर हात ठेवून बसला आहे. क्र. ४ ही त्याच्याच शेजारी पडला आहे.

भोसलेंना पाहिल्याबरोबर मालक ताडकन उठला अन् म्हणाला, 'या तुमच्याच पोलिसांनी माझं सर्वात जास्त नुकसान केलंय. तुम्ही लोक संरक्षण करायला येता की संहार करायला येता ?'

इन्स्पेक्टर भोसले समजदार होते. त्यांनी काहीही प्रतिक्रिया व्यक्त केली नाही. प्रथम स्वयंपाकघराचं दार उघडून सर्वांना बाहेर यायला सांगितलं. हॉटेलच्या दरवाज्यावर पहाऱ्यासाठी दोन पोलीस ठेवले. हॉटेलमध्ये कुणालाही यायला बंदी केली. मग ते मालकाला व कर्मचाऱ्यांना म्हणाले, म्हणाले कसले, आज्ञाच केली. 'चला, आता कामाला सुरुवात करूया. पहिल्यांदा पंचनामा, मग तपास.'

भोसलेंनी मालकाला विचारलं, 'नेमकं काय घडलं ते तुम्ही सांगू शकाल का ? तुम्ही ही घटना घडली तेव्हा हॉटेलातच होता ना ?'

'होय. मी गल्ल्यावर बसलो होतो. हॉटेलात ही गर्दी झाली होती. कामाची एकच गडबड होती. प्रत्येकाला जेवून कामावर जाण्याची घाई होती. अचानक मला अन्नपदार्थांची फेकाफेकी सुरू झालेली दिसली.'

'पण सुरुवात कशामुळं झाली ?'



'मी सांगतो साहेब' मध्येच सीनियर स्वयंपाकी बोलला, 'क्र. ४ नंच ह्या गोंधळाची सुरुवात केली.'

'अरे, पण तो तर यंत्रमानव आहे. गोंधळ तर गिऱ्हाइकं करत होती.' मालक म्हणाला.

'नाही साहेब, मी पाहिलंय, माझ्या डोळ्यांनी. ह्या गोंधळाच्या काही मिनिटं अगोदर ह्याच क्र. ४ नं माझ्या अंगावर हे मटनाचं गरम पातेलं स्वयंपाकघरात उपडं करायचा प्रयत्न केला होता. त्याची तक्रारही मी आमच्या साहेबांजवळ केली होती.'

भोसलेंनी क्षणभर त्या आडव्या पडलेल्या क्र. ४ कडे पाहिलं अन् विचारलं, 'तुमच्या हॉटेलात यंत्रमानव किती अन् माणसं किती आहेत ?'

'चार यंत्रमानव वेटर्स म्हणून काम करतात. आणि इतर सहा माणसं स्वयंपाकघरात. पैकी हा सीनियर स्वयंपाकी अन् हा नुकताच महिन्यापूर्वी लागलेला स्वयंपाकी. बाकीचे सगळे मदतनीस.'

मग इन्स्पेक्टर भोसले एकेकाची जबानी घेऊ लागले. त्यातून त्यांना एवढंच कळलं की ह्या दोन स्वयंपाक्यांचं पहिल्याच दिवसापासून पटत नव्हतं. पण त्यांच्याशी भोसलेंना काही कर्तव्य नव्हतं. त्यांनी मग क्र. ४ चीच तपासणी करायचं ठरवलं.

'ह्या क्र. ४ ची तपासणी करायला याला माझ्याबरोबर नेतोय. तोपर्यंत...' भोसलेंचं वाक्य पूर्ण होण्यापूर्वीच मालक म्हणाला, 'असं केलं तर साहेब, मी या कंपनीच्या मेकॅनिकलाच बोलावतो आता.'

'नाही. मीच त्याची आमच्या पद्धतीने आधी तपासणी करणार. तोपर्यंत कुणीही, काहीही करायचं नाही. हॉटेलही काम पूर्ण होईपर्यंत बंद राहील. आणि तुम्ही मी सांगेन तेव्हा पोलीस स्टेशनवर हजर व्हा.'

एवढं म्हणून एका हवालदाराला हॉटेलवरच ड्यूटी लावून क्र. ४ ला आपल्या सोबत घेऊन इन्स्पेक्टर भोसले निघाले.

दुसऱ्या दिवशी हॉटेल मालकाला इन्स्पेक्टर भोसलेंनी बोलावणं पाठवलं. मालक आल्यावर ते म्हणाले, 'मला तपासणी केल्यावर असं

'तुझी ड्यूटी केव्हा सुरू होते?' गुरख्याला भोसलेंनी विचारलं.

'साहेब, हॉटेल रात्री १२ वाजेपर्यंत चालू असते. पण माझी ड्यूटी रात्री १० ते सकाळी ८ वाजेपर्यंत असते. हॉटेलात स्वयंपाकघरातील कामाला आठ वाजता सुरुवात होते. मालकही जवळपास त्याच वेळेस येतात.'

'रात्री तुम्ही दोघेच हॉटेलात असता की आणखी कुणाला सोबतीला बोलावता?'

'नाही साहेब, मालकांनी तशी सक्त ताकीद देऊन ठेवली आहे. बाहेरच्या कुणाला आत घ्यायचं नाही म्हणून.'

मग भोसलेंनी त्या स्वयंपाक्याला बोलावलं अन् सहज विचारल्यासारखं म्हटलं, 'ह्या हॉटेलात अन् तुझ्या पूर्वीच्या हॉटेलात काही फरक जाणवतो का?'

'साहेब, ह्या हॉटेलातील सगळेच चांगले आहेत. माझं जरी सीनियर स्वयंपाक्याशी पटत नसलं, तरी मला हे कबूल केलं पाहिजे की, तो माणूस त्याच्या कामात एवढा हुषार आहे की, आपल्या आख्ख्या जिल्ह्यात त्याच्यासारखा दुसरा कुणी सापडणार नाही. त्याच्या हातच्या पदार्थांची चव काय ती न्यारीच. म्हणूनच तर हे हॉटेल एवढं तेजीत चालतंय.'

'मग तुझं त्याच्याशी का पटत नाही?'

'त्याचं काय आहे साहेब, मी कितीही चांगलं बनवलं, तरी प्रत्येक वेळेला त्याचाच दाखला दिला जातो. मग मला चीड येणार नाही तर काय? असं वाटतं कधीकधी की त्याचा हातच तोडावा.' असं बोलून त्यानं एकदम जीभ चावली.

भोसले मात्र विचार करू लागले होते की, हा माणूस त्या हॉटेलच्या मालकाचा हस्तक नसेल कशावरून? त्याचं या स्वयंपाक्याशी वागणं, त्या मालकाशीही संबंध ठेवून असणं अन् हॉटेलात राहणं. आपण सुतावरून स्वर्ग तर गाठत नाही ना असं त्यांना क्षणभर वाटून गेलं. पण त्यांना क्र. ४ च्या मेंदूमधून तपासणी करताना सापडलेला रुमालाचा



तुकडा... आणि त्यावरील आद्याक्षरं याचा ह्याच्या नावाच्या आद्याक्षरांशी संबंध जुळत असल्याचा पुरावा मिळत होता. पण एकाच आद्याक्षरांची अनेक माणसं असू शकतात. तो काही पुरावा होऊ शकत नाही. तरीही खडा टाकावा म्हणून त्यांनी त्याला विचारलं, 'मी आज गडबडीत रुमाल आणायला विसरलोय. जरा तुझा रुमाल दे! काय भयंकर उकडतंय.'

त्याने झटकन आपल्या खिशातून रुमाल काढून भोसलेंना दिला. त्यांना असं दिसलं की, ह्या रुमालाचा रंग आणि कपडाही तोच आहे. त्यांनी रुमालाने चेहरा पुसण्यासाठी तो आख्खा उलगडला तर त्याचा नेमका कोपरा फाटलेला दिसला. तोंड पुसल्यावर तो खिशात टाकत ते म्हणाले, 'हा रुमाल मी धुऊन आणून देईन.'

दुसऱ्या दिवशी त्यांनी हॉटेलच्या मालकाला सांगितले की, 'तपास जवळजवळ पूर्ण होत आला आहे. आता एवढा पुरावा तयार आहे की कोर्टात केस उभी राहू शकेल.'

अधिऱ्या स्वरात मालकाने विचारले, 'कोण आहे तो गुन्हेगार? माझी नुकसानभरपाई मिळेल ना?'

'गुन्हेगार आहे तुमचा नवा स्वयंपाकी. तुमच्या समोरच्या हॉटेलचा हस्तक.'

'काय? ते कसं शक्य आहे?'

'उद्या समक्ष मी त्याची उलटतपासणी घेईन तेव्हा तुम्हीही या.'

दुसऱ्या दिवशी भोसले हॉटेलमध्ये आले. आल्याआल्याच त्यांनी त्या नव्या स्वयंपाक्याला दमात घ्यायला सुरुवात केली. तेव्हा तो म्हणाला, 'साहेब तुम्ही माझ्यावर दात धरल्यासारखे का बोलताय? मी तर काहीच केलेलं नाहीय. गरीबावर अन्याय करताय तुम्ही.'

'तू त्या समोरच्या हॉटेलवाल्याचा लांबचा नातेवाईक नाहीस? तुझ्याकडं गणकयंत्राच्या अभ्यासाचं प्रमाणपत्र नाही? क्र. ४ च्या मेंदूतील गणकयंत्रात चुकीचा प्रोग्राम तू भरवला नाहीस?'

'साहेब, हे... हे फार होतंय. पहिल्या दोन गोष्टी खऱ्या असल्या तरी शेवटची गोष्ट मी केलेली नाही.'